






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




भारती विद्यापीठ, पुणे



भारती विद्यापीठ विश्वविद्यालय, पुणे

# ज्ञानज्योत लाविता...उजळती दशदिशा






**मा. डॉ. पतंगराव कदम**

संस्थापक, भारती विद्यापीठ, पुणे
कुलपती , भारती विद्यापीठ अभिमत विश्वविद्यालय, पुणे

- ***आमचे नियत कार्य....***
  गतिमान शिक्षणातून सामाजिक परिवर्तन
- ***आमची वनचबध्दता....***
  अत्याधुनिक साधनांद्वारे व आधुनिक पध्दतीचे उपयोजन करून विद्यार्थ्यांना उत्कृष्ट दर्जाचे शिक्षण व प्रशिक्षण देणे
- ***आमची बांधिलकी....***
  अखिल मानवी समाजाच्या कल्याणसंवर्धनासाठी व त्यांचा दुःखभार हलका करण्यासाठी सातत्याने प्रयत्न करणे
- ***आमचे उद्दिष्ट....***
  आमच्या शैक्षणिक संस्थांमधून विद्यार्थ्यांना शिक्षण देऊन सुजाण नागरिक, कार्यक्षम व्यावसायिक व तज्ज्ञ, दूरदृष्टी व मानवी हिताचे भान असणारे शास्त्रज्ञ निर्माण करणे
- ***आमचे स्वप्न....***
  जागतिक किर्तीच्या उच्च शिक्षण संस्थांच्या मालिकांमध्ये आमच्या शिक्षणसंस्थांना मानाचे स्थान प्राप्त करून देणे.

**शैक्षणिक केंद्रे**

पुणे | मुंबई | नवी दिल्ली | पांचगणी | सातारा | सांगली
कराड | कोल्हापूर | सोलापूर | रायगड | ठाणे (जव्हार)

**विद्याशाखा**

| | |
|---|---|
| वैद्यकीय | दंतचिकित्सा |
| आयुर्वेद | होमिओपॅथी |
| शास्त्र | अभियांत्रिकी |
| औषध निर्माण | व्यवस्थापन |
| वाणिज्य | वास्तुशास्त्र |
| विधी | सामाजिक शास्त्रे |
| विज्ञान | हॉटेल व्यवस्थापन |
| पर्यावरण | शारिरीक शिक्षण |
| शुश्रूषा | कृषी |
| कला | कला (आर्ट) |

कनिष्ठ महाविद्यालये – १४
पूर्व प्राथमिक + प्राथमिक शाळा (इंग्रजी) – १९
प्राथमिक शाळा + माध्यमिक शाळा (मराठी) – ३८

मध्यवर्ती कार्यालय : भारती विद्यापीठ भवन, लालबहादूर शास्त्री मार्ग, पुणे ३०. फोन : २४३३५७०१, २४३३५५०९ फॅक्स : (०२०) २४३३९१२१






अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३३८ ऑक्टोबर ते डिसेंबर २०११

संपादक

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**

प्रकाशक

**प्रा. मिलिंद जोशी**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाष ०२०-२४४७५९६३

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



# अनुक्रमणिका




मुद्रक-प्रकाशक
**प्रा. मिलिंद जोशी,**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**एच्. एम्. टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

**किंमत १५/- रुपये**

प्रकाशन : डिसेंबर, २०११


*या अंकात व्यक्त झालेल्या विचारांशी संपादक आणि संपादन-समिती, सल्लागार मंडळ अथवा प्रकाशक सहमत असतीलच, असे नाही.*




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संपादकीय

# रेषाविष्कार!

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

'कॉमन मॅन' (Common-man) म्हणजे विश्वात्मक पुरुष होय! ऐतरेयोपनिषदात विश्वात्मक पुरुषाची एक महान मानवी आकृती कल्पिली आहे. पुरुषसूक्तातही पहिल्याच ऋचेत ह्या विराट पुरुषाचे सूचक वर्णन आहे –

*सहस्रशीर्ष पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।*
*स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्शाङ्गुलम् ॥*

ह्या विराट पुरुषाला हजारो मस्तके आहेत, हजारो नेत्र आहेत, हजारो पाय आहेत. सर्व भूमीला व्यापून ('स भूमिं विश्वतो वृत्वा') आणि विश्वाला व्यापून जो दशांगुळे उरतो, इतका तो विराट-विशाल आहे. असा विश्वव्यापी, विश्वचक्षु, विश्वतोमुख पुरुष म्हणजेच– हा समाजपुरुष होय. तोच 'कॉमन मॅन!' देवाला देवपण देणारा आणि माणसाला माणूसपण देणारा! माणसाचा हा 'कॉमन फॅक्टर' (सामायिकता) आहे. त्याला जी देहाकृती दिली आहे; ती वरकरणी पुरुषाची जरी दिसत असली, तरी तो प्रकृति-पुरुषात्मक म्हणजे सर्व शारीरगुणधर्मांनी युक्त आहे. त्याला तहान-भूक लागते. सुखदुःखाने तो प्रभावित होतो. त्यात स्त्रीत्वही आहे आणि पुरुषत्वही आहे. त्यात कोणताही असामान्य गुण नाही! त्याच्या सुखदुःखाला मर्यादा आहे, ती त्याच्या सामान्यत्वाचीच! महागाईभत्त्यात वाढ झाली की त्याला आनंद होतो, आणि अन्याय पाहिला की त्याला चीडही येते. पण मर्यादेतच! बुद्धासारखे राजवैभव सोडून बोधिवृक्षाखाली बसण्याची त्याची त्यागशक्ती नसते. महागाईभत्त्याच्या फरकातून तो सव्वारुपया देवाला देऊ शकतो, सोन्याचा मुकुट नाही! परंतु त्याची सहस्रशीर्षे भक्तीने जेव्हा एकाच वेळी नम्र होतात, विठुनामाचा गजर करतात, त्यावेळी कळिकाळालाही घाम फुटतो! कारण 'तो' 'जो' अनाकलनीय असा सर्वशक्तिमान दशांगुळे उरलेला आहे. 'त्याने' ह्या सरळ-साध्या सामान्यत्वाच्या हृदयात स्थान मिळविलेले आहे. त्याला फाटक्या वस्त्रातील निर्मळ हृदयच आवडते. 'सर्वस्य च अहं हृदि संन्निविष्टो' असे गीतेचे वचन सर्वश्रुत आहेच. 'श्वेताश्वतरोपनिषदातील' 'अतिष्ठत दशाङ्गुलम्...' चा अर्थ काही विद्वानांनी असाही लावला आहे की, इंद्रियांनी न समजणारा पण इंद्रियांद्वारे प्रकट होणारा; तरीही निराकार-निरावयव असलेला परमेश्वर इंद्रियात न सामावता दहा अङ्गुळे उरतो. तो 'नाभीपासून वर दशाङ्गुळे असलेल्या हृदयरूपी गुहेत राहातो.' मात्र तेथे तो सुप्तावस्थेत असतो. कधीतरी, अगदी सहनच झाले नाही की, तो जागा होतो; आणि राज्यक्रांती, धर्मक्रांतीही घडवून आणतो! नंतर सिंहासनावर न बसता परत आपल्या साध्याभोळ्या रूपात वावरू लागतो. असा हा विराट समाजपुरुष एरवी अंगुष्ठमात्र आत्म्यासारखा 'अंगठ्याएवढा' आहे. तो चिरंजीव आहे! नेहमी सत्य बोलावे. कर्तव्यात चुकू नये. भ्रष्ट होऊ नये. आई-वडिलांना देव मानावे आणि विशेष म्हणजे दुसऱ्या कोणाच्याही धनाची आशा न बाळगता कर्तव्यकर्मे करीत शंभर वर्षांचे पूर्णायुष्य जगावे; अशा धारणेत हा 'सामान्य माणूस' (Common man) युगायुगांचा जीवनसाक्षी आहे. त्याला आर के लक्ष्मण ह्यांनी आपल्या व्यंग्यात्मक रेषांनी 'रूप' दिले आहे. आर के लक्ष्मण (रसिपुरम् कृष्णस्वामी लक्ष्मण) म्हणतात. "He's been with me throughout my career. I didn't find him. He found me... I would say he symbolises the mute



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

millions of India, or perhaps the whole- world, a silent spectator of marching time."

केवळ अब्जावधी भारतीयांचाच नव्हे, तर सगळ्या जगाच्या इतिहासाचा तो साक्षीदार आहे. आर. के. लक्ष्मण वरील उद्‌गारात म्हणतात, " 'कॉमन-मॅन'ला मी शोधले नाही; किंवा ती माझी निर्मितीही नाही. जो होता व आहे; तो माझ्या रेषांना भेटला. माझ्या कुंचल्याच्या रेषांमधून तो प्रकटला.'' — रेषाविष्कृत झाला!

'अक्षर' हे लिखित वाङ्‌मयाचे माध्यम, तर 'रेषा' चित्रकलेचे!

व्यंगचित्रात किंवा व्यंग्यचित्रात 'रेषा' कुणाचे तरी विडंबन करते; त्यावेळी त्या प्रतिमेमागे एक निश्चित व्यक्ती असते. वर्तमानातील किंवा भूतकाळातील! लिखित वाङ्‌मयातही अक्षराचा शब्द होताना; आणि शब्दांचे वाक्य होताना... वाक्याला कथा, कादंबरी किंवा कविता भेटते. शब्दांशी एकरूप होते. तसा आर. के. लक्ष्मण यांच्या रेषांशी 'कॉमन मॅन' एकरूप झाला. तो रेषाविष्कार होय! रेषांना, आविष्कार येऊन मिळाला. आणि 'कॉमन मॅन' प्रकट झाला. उपमान आणि उपमेय ह्यांच्या दृष्टिपलीकडचा हा रेषा आविष्कार आहे. कलानिर्मितीची ही प्रक्रिया दैवी सायुज्यतेच्या साक्षात्कारातून घडते.

सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता ह्या ईश्वरीतत्त्वाच्या साक्षात्काराच्या चार पायऱ्या मानल्या जातात. तशाच त्या कोणत्याही कलाविष्काराच्या आहेत. संपूर्ण कलातत्त्व रस-रंग-गंध-स्पर्शासह आविष्कृत होणे ही अत्युच्च पायरी सायुज्यता होय. ज्याने दक्षिण भारतातील नयनमनोहर गोपुरांचे आणि राजवाड्यांचे शिल्प बनविले, तो अरिशनेमी पाथरवट कलाकार 'त्या' सायुज्यतेच्या साक्षात्कारासाठी वेडापिसा झाला होता. भौतिक कलानिर्मितीला तो कंटाळला. आपल्या शिल्पकलेला 'सायुज्यतेचा' स्पर्श कुठे मिळतो का ते पाहाण्यासाठी कलानिवृत्ती घेऊन तहानभूक आणि उन्हापावसाची पर्वा न करता तो रानोमाळ भटकू लागला. आपल्या छिन्नी-हातोड्याला दैवी कलानिर्मितीचे ठिकाण तो शोधू लागला. ही अस्वस्थता म्हणजेच 'सलोक' शोधण्याची, 'समीप' जाण्याची आणि 'सरूपता' शोधण्याची प्रतीक्षा होय. कलाकार ह्या प्रतीक्षेत विरहव्याकुळ धुंदीत असतो. कवि शब्दांच्या, गायक सूर लागण्याच्या आणि छायाचित्रकार रम्यतेच्या तसा चित्रकारही आपल्या कुंचल्यातील रंग-रेषांना 'तो' स्पर्श शोधण्याच्या प्रतीक्षेत असतो. जशी शबरी! रामाच्या प्रतीक्षेत– 'उद्या श्रीराम येणार!' म्हणून लता-वृक्षांशीच संवाद करणारी! शिल्पकार अरिशनेमीची प्रतीक्षा त्या क्षणी थांबते; जेव्हा पावसात भटकताना एका उंच पाषाणावर वीज कोसळते, आणि भग्न पाषाणातून तीर्थंकराच्या मुंडन केलेल्या शिरोभागाचे 'दर्शन' त्याला होते. त्यातूनच श्रवणबेळगोळ येथील ११६ फुटी गोमतेश्वराच्या शिल्पाकृतीच्या सायुज्यतेचा साक्षात्कार घडला! कलाकाराच्या प्रतीक्षेचा असा आनंददायक साक्षात्कार आर. के. लक्ष्मण यांच्या कुंचल्यालाही घडला! सुरुवातीला ते विविध प्रांतांच्या वेषात सर्वसामान्य व्यक्ती आपल्या रेषांनी प्रकट करीत असत. पुढेपुढे हा बंगाली, हा राजस्थानी हा तमिळी इ. आविष्कार हळूहळू मागे पडले; आणि 'कॉमन मॅन'ची आकृतीच अखेर स्थिरावली. प्रतीक्षा संपली आणि 'कॉमन मॅन' च्या ह्या आविष्काराशी सर्वांनी नाते जोडले!

'आविः' म्हणजे प्रकाश. प्रकाशरूप ज्ञान रेषांमधून प्रकट झाले. 'कॉमन मॅन' ही कुणा एकाची व्यंग्य-प्रतिमा नाही. तुमच्या-आमच्या सर्वांच्याच मनाचा तो एक सार्वत्रिक भावाविष्कार आहे. तो बाल नाही; की तरुणही नाही. निवृत्तीच्या अवस्थेतला आहे. त्याने सर्व पाहिले-भोगले-सोसले-अनुभवले आहे; तरी आपण कुणी ज्ञानी असल्याचा त्याचा आविर्भाव नाही. कालप्रवाहाचा तो मूक साक्षीदार आहे. चुरगळलेले धोतर आणि गुंड्या वरखाली लावलेला चौकटीचा



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

कोट, जीर्ण झालेले बूट, टक्कलाभवती उरल्यासुरल्या अस्ताव्यस्त केसांचा अर्धचंद्र, जाड भिंगांच्या चष्म्यातून ओसंडणारी दृष्टी आणि छपरी मिशांच्या आड दडलेल्या उदासीन स्मितरेषा! वृत्तपत्राच्या घडीतून काळाला बगलेत मारून झपझप् पावले टाकणारा हा 'कॉमन मॅन' – रामकृष्णांच्या, छ. शिवाजी – पहिल्या बाजीरावाच्या, गांधी-नेहरूंच्या, सर्व कालगतीबरोबर चालतोच आहे. हा रेषाविष्कार मनाला अस्वस्थ करणारा आहे. विश्वव्यापी सहनशक्तीचा तो आविष्कार आहे; आणि तोही व्यंग्याविष्कार आहे. दु:खगर्भ व्यंग्याविष्कार!

व्यंग्यरेषांना हे मोठे आवाहन आणि आव्हानही होते. व्यंग्यरेषांचा व्यापार सरधोपट नसतो. सरळ रेषांमधून व्यक्त होणारी चित्रकला म्हणजे काव्यांगातील अभिधावृत्ती होय. जसे आहे तसे रेखाटण्यालाही कलेचा हात लागतो. परंतु व्यंग्यचित्रात मुख्य रेषांचा व्यंगव्यवहार, मुख्य प्रतिमेचे अंतरंग अधिक बोलके करते.

'कॉमन मॅन' व्यंग्यरेषेतून प्रकट झाल्यामुळे त्याच्या सर्वसामान्य पोषाखाचे दारिद्र्य आणि जीवनात काहीही मिळाले नाही, दुसऱ्याने लुबाडले तरी प्रतिकारशक्ती न दाखविणारा न्याय-अन्यायाच्या परिस्थितीपलिकडचा कारुण्याविष्कार स्मितहास्यातून अधोरेखित होतो. वक्रोक्ती हे काव्याचे जसे प्रभावी अंग आहे तसेच ते रेषांच्या बाबतीतही आहे. रेषांचीही व्यंग्यात्मक दु:खगर्भ भावलिपी आहे.

'काळ'कर्ते शिवराम महादेव परांजपे यांच्या उपरोध-उपहास आणि व्याजोक्तीपूर्ण शब्दांनी एक काळ गाजविला आणि काळ घडविलाही! आचार्य अत्र्यांच्या 'नवयुग' मध्ये आणि नंतर स्वत:च्या 'मार्मिक' मध्ये बाळासाहेब ठाकरेंनी व्यंगचित्रांचे सामर्थ्य काळालाही बदलविणारे असते याचा प्रत्यय दिला; हे सर्वज्ञात आहे. श्री. शि. द. फडणीसांची 'हसरी-गॅलरी' म्हणूनच चिरस्मरणीय आहे. कार्टून-मालिका बालकांमध्ये लोकप्रिय आहेत कारण त्यातून प्रकट होणारी निरागसता! मिकीमाऊस, टॉम आणि जेरी यांच्यातील भांडणेही निरागस आहेत. तेथे कुणालाच प्राणघातक इजा पोहोचत नाही. कितीही उंचावरून पडला, पाण्यात बुडाला, हत्तीच्या पायाखाली गेला तरी कुणी मरत नाही. शिल्लक राहतो तो हास्याविष्कार! निरोगी!! व्यंग्यचित्रांच्या रेषांनी कुणाच्याही मनात वैरभाव शिल्लक राहात नाही. गंभीर गोष्टी गमतीदारपणे आविष्कृत होतात; आणि शिल्लक राहातो तो अंतर्मुख करायला लावणारा रेषाविष्कार!

रेषांच्या मर्यादेत प्रकटलेला हा 'कॉमन मॅन' भिकारी नाही! कोडगा नाही. त्याच्या स्वप्नांच्या दुनियेत तोही रामराज्याची स्वप्ने पाहातो. तो साधू-संतही नाही. तो सहन करतो; कारण त्याला आपल्या मर्यादित अशा सामर्थ्याची पुरेपूर जाणीव आहे. त्यामुळेच 'इदं न मम!' ह्या भावनेने तो आपली समजूत काढतो. जे मर्यादेबाहेरचे, ते आपले नाही! पंचतंत्र, इसापनीतीतील कथांनी आणि संतवचनांनी त्याचे मन घडलेले आहे. सामान्यत्व हीच त्याची ताकद आहे!

सु. कुलकर्णी

संपर्क :
७ गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५

संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे ३०
भ्रमणभाष - ९७६७६९९३१९







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# 'बोक्या सातबंडे'चे यश

– शंकर सारडा

*बालसाहित्य चळवळीला वाहून घेतलेले ज्येष्ठ समीक्षक श्री. शंकर सारडा यांनी 'बोक्या सातबंडे' या दिलीप प्रभावळकर यांच्या ग्रंथाला मिळालेल्या यशाच्या निमित्ताने, बालसाहित्याच्या रुंदावणाऱ्या– कक्षांची आणि अपेक्षांची केलेली चर्चा, मार्गदर्शक आहे.*

*संपादक.*

- १ -

दिलीप प्रभावळकर यांच्या बोक्या सातबंडे या पुस्तकाला यंदाचा साहित्य अकादमीचा बालसाहित्य पुरस्कार जाहीर झाला आहे. साहित्य अकादमीतर्फे १९५५ पासून विविध भाषांतील उत्तमोत्तम साहित्यकृतींना पुरस्कार देण्यात येतात. साहित्य अकादमीच्या पुरस्कारामुळे त्या लेखकाला आणि त्याच्या पुस्तकाला एक वेगळीच मान्यता आणि प्रतिष्ठा लाभते. समकालीन लेखकांमध्ये एरवी प्रतवारी लावणे अवघड जाते; परंतु अकादमीसारख्या संस्थेने पुरस्कारासाठी निवड केली म्हणजे एका परीने त्या लेखकाला समकालीनांमध्ये वरचढ ठरवले जाते; आणि अन्य समकालीनांना ते इच्छा असो वा नसो, स्वीकारावे लागते. एखादा नवा वाङ्मयीन प्रवाह अशा पुरस्कारामुळे साहित्यात प्रतिष्ठित होतो. बलुतं, मला उद्ध्वस्त व्हायचंय यांसारख्या दलित आत्मकथनांचे पर्व सुरू झाले तेव्हा 'उपरा' (१९८१) आणि 'उचल्या' (१९८८) यांना साहित्य अकादमीचे पुरस्कार मिळाले; आणि दलित साहित्याचे भाग्य फळफळले. 'उपरा'चे लेखक लक्ष्मण माने यांना परदेशी आमंत्रणे आली, फ्रेंच वगैरे भाषांत अनुवाद झाले, साडेतीन टक्क्यांचे साहित्य म्हणून ब्राह्मणी साहित्यावरचे त्यांचे घणाघाती हल्ले मराठी माणसाला आवडू लागले. भटक्या विमुक्त जाती, जमातींमधील एक झुंजार बोलका तरुण म्हणून यशवंतराव चव्हाण - शरद पवारांनी लक्ष्मण माने यांना जवळ केले, आमदारपद दिले, आश्रमशाळा काढायला मदत केली, शैक्षणिक संकुलासाठी भरघोस निधी उपलब्ध करून दिला. साहित्य अकादमीचा पुरस्कार 'उपरा'ला मिळाला नसता तर लक्ष्मण माने यांची पुढची नेतृत्वाची वाटचाल इतकी नेत्रदीपक झाली नसती. त्यानंतर 'उचल्या' या लक्ष्मण गायकवाड यांच्या आत्मकथनाला १९८८चा अकादमीचा पुरस्कार जाहीर झाला आणि दलित आत्मकथांच्या दबदब्यात अधिकच भर पडली. साहित्य हे राजकीय, सामाजिक शस्त्र साक्ष म्हणून वापरता येते. वापरले जाते. 'उचल्या' हे लेखनाच्या दृष्टीने फारच कच्चे पुस्तक होते; परंतु उचल्या, भामटे म्हणून ओळखल्या जाणाऱ्या जमातीतील अल्पशिक्षित तरुणांचे आत्मकथन म्हणून अकादमीने त्याला गौरवले. एक सामाजिक दस्तऐवज म्हणून 'उचल्या'चे स्वागत इतर भाषांतही चांगले झाले. साहित्य अकादमीच्या काही उच्चपदस्थांना ते खूप आवडले. चीनला जाणाऱ्या भारतीय लेखकांच्या शिष्टमंडळात जाण्याची संधी लक्ष्मण गायकवाड यांना मिळाली. फिल्मसिटीत कँटीन चालविण्याचा खास परवाना त्यांना महाराष्ट्र शासनाने दिला. सध्याही ते साहित्य अकादमीच्या मराठी विभागाचे समन्वयक आहेत. लेखनाने त्यांना प्रकाशात आणले.



साहित्य अकादमीच्या पुरस्काराने असे बरेच काही घडू शकते. तरुण वयात असले मोठे पुरस्कार मिळणे हे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

आणखीनच भाग्याचे. ज्यांना ते लाभतात ते त्यांच्या कर्तृत्वाचे साहित्यबाह्य पैलूही कौतुकपात्र ठरतात.

- २ -

हे पुरस्कार आतापर्यंत प्रौढ साहित्याच्या संदर्भातच सीमित होते. गेल्या वर्षापासून ते बालसाहित्यालाही देण्यात येत आहेत. त्यामुळे बालसाहित्याकडे दुर्लक्ष होते किंवा त्याची उपेक्षा होते ही तक्रार थोडीफार कमी होऊ शकेल. गेल्या वर्षी अनिल अवचट यांच्या 'सृष्टीत...गोष्टीत' या पुस्तकाला साहित्य अकादमीचा बालसाहित्य पुरस्कार दिला गेला. बालसाहित्याच्या क्षेत्रात अनिल अवचट यांचे हे पहिलेच पाऊल. पण ते मोठे दमदार होते. आजोबांच्या भूमिकेत गेलेले अनिल अवचट आपल्या नातवंडांच्या सान्निध्यात स्वत:च्या बालपणाचे क्षण जणू पुन्हा जगू पाहतात; बालसदृश निरागस वृत्तीने अवतीभवतीच्या परिसरातल्या प्रत्येक गोष्टीकडे नव्या नवलाईने बघू लागतात. त्या सर्व गोष्टी त्यांच्याशी मोकळेपणाने जणू बोलू लागतात. आपल्या व्यथावेदना, सुखदु:खे, आवडीनिवडी, भयशंका प्रांजलपणे प्रकट करू लागतात. त्या त्यांच्या कहाण्या 'दाढीवाले काका' आपल्यापर्यंत पोहोचवतात. कधी मिस्कीलपणे, कधी गंभीरपणे, पंखा, टेप, विजेचा दिवा, कूलर, खांब...त्यांच्यातील हेवेदावे, स्पर्धा....माणसासारखेच सर्व काही! पण निसर्गाचा महिमा अपरंपार...पंख्याच्या नियंत्रित वाऱ्यापेक्षा स्वाभाविक झुळूक परमशीतल!

असे कल्पनाशक्तीचे तरल, वास्तवदर्शी नमुने अवचटांच्या या बालकथांमध्ये विखुरलेले आहेत.

या प्रत्येक कथेवर वेगवेगळ्या अंगांनी भाष्य करता येईल. वेगळ्या दृष्टीतून आजच्या मानवी जीवनावर, पर्यावरण ऱ्हासावर, अनैसर्गिक जीवनशैलीवर टीकाटिप्पणी होऊ शकेल.

या संग्रहावर लिहिताना मी म्हटले होते, "या पुस्तकातील एकूण ऐवज बालसाहित्यात अवचटांना मानाचे स्थान मिळवून देण्यास समर्थ आहे. बालकथांना साजेशा कल्पनाशक्तीला तशाच अर्थपूर्ण, लयबद्ध भाषाशैलीची जोड मिळाल्याने या कथांचे श्रवणही सुखदायक ठरते."

या पुस्तकाला साहित्य अकादमीचा बालसाहित्याचा पुरस्कार हा निश्चितच अगदी सुविहित होता.

- ३ -

दिलीप प्रभावळकर यांच्या 'बोक्या सातबंडे' या बालनायकाच्या विविध करामतींच्या कथांची सात पुस्तके १९९४ पासून म्हणजे गेल्या सतरा वर्षांत निघाली आहेत. या सात पुस्तकांत मिळून तीसावर कथा समाविष्ट झाल्या आहेत.

आकाशवाणीसाठी प्रभावळकरांनी वीस-पंचवीस श्रुतिका लिहिल्या. त्यात बोक्या सातबंडे हा बालनायक केंद्रस्थानी होता. दहा वर्षे वयाचा हा बालनायक एका हाऊसिंग सोसायटीत राहणारा. घरी त्याचा छोटा भाऊ विजयेंद्र - कॉलेजात जाणारा. नाट्य वगैरे विषयात रस घेणारा. बोक्याचे खरे नाव चिन्मयानंद. पण त्याची आजीच त्या नावाने हाक मारते. बाकी सर्वजण 'बोक्या' या नावानेच त्याला हाक मारतात. त्याचे वडील प्रदीप सातबंडे. आई महिला मंडळात सक्रिय. आजी थोडी मॉडर्न. सर्वांशी मिळून मिसळून वागणारी. बोक्यावर तिचा फार जीव असणारच! सातबंडे परिवार तसा सुखवस्तू. घरात वातावरण मोकळे. शिवाय कॉलनीतले शेजारी, शाळा कॉलेजातले मित्र, शिक्षक तसे मर्यादित जग.

बोक्या कल्पक, चलख, चतुर, बोलका, चटपटीत. दुसऱ्यांना नेहमी मदत करणारा. त्यासाठी हवे ते करणारा. लोकांचे मानसशास्त्र जाणणारा. समकालीन वास्तवाचे भान असणारा. 'इव्हेंट मॅनेजमेंटचे' उपजत ज्ञान असणारा.

राजहंस प्रकाशनच्या दिलीप माजगावकरांनी श्रुतिकांचे कथांमध्ये रूपांतर करण्याचा आग्रह केला.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

त्यामुळे दिलीप प्रभावळकर यांनी बोक्याच्या कथा लिहिल्या. दहा वर्षे वयाला झेपतील अशी साहसे त्याला करायला लावली.

बोक्या एकदा कॉलनीतल्या ठिम्या घोसाळेच्या घरातले रंगीत मासे, पांढरे उंदीर, लव्हबर्ड्स, बेडूक, एवढेच नव्हे तर बिनविषारी साप, कासव वगैरेंना घरी घेऊन येतो. आठ दिवस त्यांना घरी ठेवतो... त्यात जे घोटाळे होतात त्यातून सारे घरच नव्हे तर कॉलनीत हलकल्लोळ माजतो. आठ दिवसांनी घोसाळे कुटुंब बेळगावहून परत येते; तेव्हा बोक्याची सगळेजण तारीफ करतात. बोक्या दादाच्या प्रेमप्रकरणात मदत करतो. हंगामेंच्या घरात डांबून ठेवलेल्या संगीताला त्यांच्या तावडीतून सोडवून तिच्या आईवडिलांकडे पोहोचवतो. आपल्याकडे आलेला नंदकिशोर भातसांडे या आगाऊ गळेपडू पाहुण्यांना पळवून लावतो. पैसे मिळविण्यासाठी 'बेबी सीटिंग' करतो, दादाच्या नाटकातले एक पात्र आजारी पडते तेव्हा आपल्या बाबांना तो त्या नाटकात काम करायला तयार करतो. गुप्त खजिना मिळविण्यासाठी अंगुष्ठे यांच्या अंगणात खड्डा खणतो. गुप्त खजिना सापडत नाही, पण त्या खड्ड्यात अगुंष्ट्यांचा भावी जावई पडून त्याचे हाड मोडते. त्यामुळे अंगुष्ट्यांची बेबी बोक्याला 'नको त्या नवऱ्यापासून वाचवले' म्हणून धन्यवाद देते. आपल्या कॉलनीतल्या कामवाल्या बायांच्या घरच्या मुलांसाठी सुट्टीचे शिबिर घेऊन, त्यांना स्पेशल बसने सहलीसाठी खंडाळ्याला घेऊन जातो. घाटात ब्रेक निकामी झाल्यावर बोक्या धाडसाने बस थांबवतो. त्याच्या साहसाची बातमी वृत्तपत्रात येते. त्याला बक्षीस मिळते. शाळेत सत्कार होतो. अशा करामतींनी बोक्या बालवाचकांचा आणि त्यांच्या पालकांचा मित्र झाला.

गोट्या, फास्टरफेणे व राजू प्रधान (सुधाकर प्रभू), वगैरे कुमारनायकांच्या कर्तृत्वाच्या कथांचेच कालोचित विस्तारीकरण (एक्स्टेंशन) दिलीप प्रभावळकरांच्या 'बोक्या'मध्ये प्रकट होते. प्रभावळकरांच्या मिस्कील टंग इन चिन विनोदाचे कारंजे या कथांना जीवनरस पुरवते. 'राजहंस'च्या वितरणयंत्रणेमुळे बोक्या सातत्याने बालवाचकांपुढे येत राहिला. त्याच्या आवृत्त्या निघत राहिल्या. (ताजी आवृत्ती ही १४ वी आवृत्ती आहे.) प्रभावळकरांच्या नाट्य-चित्रपट क्षेत्रातील स्थानामुळे 'बोक्या'वर बालचित्रपटही निघाला. टीव्ही मालिका निघाली, त्यामुळेही बोक्याचे नाव घरोघरी पोचले.

बोक्याचे पहिले तीन भाग डिसेंबर १९९४ मध्ये निघाले; परंतु चौथा-पाचवा भाग निघायला एप्रिल २००७ चा मुहूर्त मिळाला. मध्ये तेरा वर्षे गेली. राजहंसऐवजी दुसऱ्या एखाद्या प्रकाशनाकडे हे पुस्तक असते तर तेरा वर्षात दोन-चार आवृत्त्यातच थांबले असते. बोक्याचे सहा-सात हे भाग जुलै २०११ मध्ये निघाले. चार वर्षांनी. या १७ वर्षात बोक्याचे वय बारा हेच कायम राहिले. त्याचे कौमार्य अभंग राहिले.

गोट्या (ना. धों. ताम्हनकर), फास्टर फेणे (भा. रा. भागवत) या दोन कुमारनायकांनी आणि त्यांच्या क्लोननी मराठी बालमनाचे त्या त्या काळात, गेल्या शतकात रंजन केले. मराठी मुलांना रोल मॉडेल पुरवले. रेल्वेने प्रवास हे गोट्याच्या दृष्टीने एक मोठे थ्रिल होते. नेफा आघाडीवर चिनी सैनिकांचा समाचार घेणे, बैलगाडीच्या शर्यतीत भाग घेणे, विमानचोरांना हिसका दाखवणे, चक्रीवादळात सापडलेल्या लोकांची सुटका करणे वगैरे साहसांमुळे 'फास्टर फेणे' हा समकालीन वाटला. मुलांना प्रिय झाला.

'बोक्या सातबंडे' हा फास्टर फेणेच्या पुढचा टप्पा म्हणता येईल. तोही समकालीन वास्तवाशी आपले सूत जुळवतो. ध्वनिप्रदूषण, शॉपिंग मॉल, मॉडेलिंग, ओल्ड पर्सन्स एक्स्चेंज प्रोग्रॅम, (ओपीईसी) असे त्याचे कार्यक्षेत्र विस्तारलेले आहे. दादाचे नाटक पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या दामलेसारख्या गुंड प्रवृत्तीच्या तरुणाचा बंदोबस्त करणे, हॉस्पिटलमध्ये



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणे वाग्यज्ञे तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

आई असताना इतर पेशंटना मदत करणे वगैरे कामे तो लीलया करतो. आजीच्या पंचाहत्तरीचा सोहळा साग्रसंगीत घडवून आणून इव्हेंट मॅनेजमेंटचे कौशल्य प्रकट करतो. वडिलांच्या सरांचा सत्कारसमारंभ थाटात साजरा करतो. एवढेच नव्हे तर जर्मनीतील एका छळछावणीच्या म्युझियमला भेट देऊन, तेथे दिसलेल्या छायाचित्रावरून संबंधित व्यक्तीचा शोध लावून, तिला भेटून, तिला आपण काढलेले चित्र देतो. "आपण माणसं आहोत." हे त्याचे उद्‌गार जर्मनीतील टीव्हीवरून सर्वदूर पोचतात.

'बोक्या'चे पराक्रम याच शैलीत पुढे चालू राहतील. फास्टर फेणेचे वीस भाग निघाले. चाळीस वर्षे जाऊनही फास्टर फेणे बारा-तेरा वर्षाचाच राहिला. गेल्या १६-१७ वर्षात बोक्याही दहा-बारा वय टिकवून आहे. सात पुस्तके निघाली आहेत. हाउसिंग कॉलनीतला मध्यमवर्गीय बोक्या आपल्या जीवनशैलीशी एकरूप झालेला आहे.

-४-

'बोक्या'ला साहित्य अकादमीचा बालसाहित्याचा पुरस्कार मिळाला हे उचितच झाले. अनिल अवचट आणि प्रभावळकर हे एकविसाव्या शतकातल्या पहिल्या दशकातले बालसाहित्यकार म्हणून प्रस्थापित होतील. पुढच्या बालसाहित्यकारांना कुमारनायकांची कारकीर्द रंगवताना संगणक, इंटरनेट, मोबाईल, सोशल नेटवर्किंग, आभासमय विश्व याकडे वळावे लागेल. अंतरिक्षयाने, हॅरी पॉटर, हॉबिड लॉर्ड ऑफ द रिंग सारख्या फँटसीकडे वळावे लागेल. छोट्या कथांऐवजी हॅरी पॉटरप्रमाणे अनेक खंड व्यापणारे विशाल विश्व निर्माण करावे लागेल. अचाट कल्पनाशक्तीची आराधना-साधना करावी लागेल. बालसाहित्य हे नव्या दशकात अब्जावधींच्या उलाढालींचे केंद्र ठरणार आहे. आजच्या हुशार, तल्लख, तंत्रज्ञानप्रवण मुलामुलींना अर्थपूर्ण वाटेल असे काही लेखन करण्याचे आव्हान मोठे असणार आहे. बालसाहित्याची उपेक्षा करणे कोणालाच परवडणार नाही.

साहित्य अकादमीच्या पुरस्कारामुळे बालसाहित्य क्षेत्रात नव्या प्रतिभावंतांची मांदियाळी होऊन प्रकाशकही त्याच्या निर्मितीकडे अधिक कलात्मक दृष्टीने पाहू लागतील. आजवर बालसाहित्यकार हा अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष झाला नाही अशी खंत यदुनाथ थत्ते वगैरे बोलून दाखवत. आता तशी संधी आली तर ती साहित्य अकादमीच्या बालसाहित्य पुरस्काराची कसोटी पूर्ण करणाऱ्यालाच मिळेल. जागतिक पातळीवर मराठी बालसाहित्याला आज काहीच ओळख नाही. ती मिळविण्याची जिद्द या पुरस्कारामुळे अल्पस्वल्प प्रमाणावर कोणी दाखवली तर ती सृजनप्रक्रियेला चालना देईल.

◇◇◇

**शंकर सारडा**
ई १० पाटील रिजन्सी, हॉटेल कलिंगमागे,
१५, एरंडवणे, पुणे - ४११ ००४
९८२३२६१०२३

## वरील ग्रंथाविषयी

*ग्रंथाचे नाव :* प्रसिद्ध इतिहास संशोधक गुरुवर्य वासुदेवशास्त्री वामनशास्त्री खरे-चरित्र व ग्रंथ परिचय (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
*लेखक :* दामोदर मोरेश्वर भट
*प्रकाशन वर्ष :* १९२९
*प्रकाशक :* स्वत: लेखक
*मुद्रक :* वामन वासुदेव अतीतकर बी.ए.
नवीन समर्थ विद्यालयाचा समर्थ छापखाना,
९४७ सदाशिव, पुणे २.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# स्त्रीमुक्ती चळवळीचा प्रणेता : अग्रवंश

– प्रा. वाग्वैद्य. मो. गो. धडफळे

वर्तमानकाळात स्त्रीमुक्ती या चळवळीने बराच जोर धरला आहे. बऱ्याच प्रमाणात यशही प्राप्त केले आहे. तरीही स्त्रीभ्रूणहत्येचे प्रकारही चालूच आहेत.

हिंदू धर्मात देवांइतकेच देवींनाही महत्त्व आहे. "यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवता:' हे सुभाषित प्राचीन आहे. मात्र स्त्रीमुक्तीच्या विचारात 'नारीपूजन' अपेक्षित नाही. स्त्रीचे देवीकरण हे 'glorification' वृथा उदात्तीकरण असून फसवे आहे; स्त्रीला देवता न मानता पुरुषांप्रमाणे समान हक्क असावेत; अवहेलना नसावी; स्त्रीमुक्ती ही पुरुषविरोधी नसून पुरुषप्रधान-समाजव्यवस्थेविरुद्ध आहे असे प्रतिपादन केले जात आहे. लिंगभेद नैसर्गिक आहे. मात्र लिंगवैषम्य हे मानवकृत, अ-नैसर्गिक व अ-न्यायकारक आहे ही धारणा आहे.

हिंदुधर्मात देव व देवी, 'तो' व 'ती' समान दर्जाचे असल्याने ख्रिस्ती धर्माला "Inclusive Language" (लिंगनिरपेक्ष भाषेची) नव्याने कास धरून 'तो'चे उल्लेख पुसण्याची गरज भासली, तसे हिंदुधर्माला करावे लागले नाही. अमेरिकेतील धर्मगुरूंना, एक खास समिती नेमावी लागली. या समितीने झटून काम करून आपला लेखी अहवाल सादर केला. तो सध्या विचाराधीन आहे.

या समितीने कटाक्षाने पवित्र धर्मग्रंथातील पुंनिर्देश टाळून स्त्री-पुरुषांत समानता आणण्याचा भाषिक प्रयत्न केला आहे. देवपुत्र याऐवजी देव-अपत्य (Son of God) ऐवजी Child of God, 'माणसाचा पिता' (Father of Man) ऐवजी Parent of man माणसाचे जन्मकारण अशा प्रकारचे बदल सुचवले गेले आहेत : समिती सदस्य एकमुखाने म्हणतात : "The Advisory committee recognizes the necessity of all the future translations and revisions to avoid the words which ignore the place of woman in the christian community altogether or which seem to relagate women to a secondary role" "अरे आकाशातल्या बापा! (चुकलो चुकलो, 'जन्मद व्यक्ते') केव्हातरी स्त्री ही फासळीपासून निर्मिली, हे धर्मवचनही बदलावे लागेल ना?"

ख्रिस्ती धर्मग्रंथांप्रमाणेच संस्कृत भाषेचे व्याकरणही पुरुषप्रधान होते. 'रामश्च लक्ष्मणश्च' हा इतरेतर द्वंद्व ठीक आहे, पण 'एकशेष द्वंद्व' हा समासभेद 'स्त्री'ला वगळून 'पुरुष' हा एक (च) शेष ठेवतो. 'मातापितरौ' व 'मातर-पितरौ' लिंगसमानता जपतात; पण केवळ द्विवचनी पुंनिर्देश 'स्त्री'ला नेमके गाळतो. 'पितरौ' म्हणजे माता च पिता च, भ्रातरौ म्हणजे "स्वसा (बहीण) च भ्राता (भाऊ)च, 'मृगौ' (दोन हरिणे) म्हणजे मृगी च मृगश्च (हरिणी व हरीण) असे पुंप्रधान प्रकार काय म्हणून करता माझ्या बाबांनो?"

साठ-सत्तर वर्षांपूर्वीचीच केवळ परंपरा असणारी ही 'आधुनिक' स्त्रीमुक्तीची चळवळ बर्मा (म्यानमार) येथील सद्नीति (शब्दनीति) नावाचे पालि-व्याकरण रचणारा इ. स. बाराव्या शतकातील अग्गवंस (अग्रवंश) याने केव्हाच आरंभली होती. कागदाला सरळ करायचे असले की एका दिशेची गुंडाळी नेमकी उलट्या दिशेला वळवावी लागते. तद्वत् पुरुषप्राधान्याला मुरडण्यासाठी अग्गवंसाला स्त्रीप्राधान्याचा आग्रह धरावा लागला.

संस्कृत व्याकरणातील – पुरुषप्रधान 'एक-शेषा'वर कडाडून हल्ला चढवीत अग्गवंस म्हणतो 'माता च पिता च' याचा एकशेष मातरा (संत्मातरौ) असा करा. 'मृगश्च मृगीच' याचा एकशेष मिगी (पालि)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म्हणजे, मृग्यौ (सं.) असा करा आणि 'भ्राता च स्वसा च' याचा एकशेष स्त्रीलिंगोस्वसारा (पालि) म्हणजे स्वसोरो (सं.) असा करा.

पण अग्गवंस हा खराखुरा स्त्रीमुक्तिवादी होता. त्याला ना हवे होते पुरुषप्राधान्य ना स्त्रीप्राधान्य. म्हणून तो अखेरीस म्हणतो "अहो, व्याकरणातून हा 'एकशेष' द्वंद्व नावाचा समासप्रकारच गाळा आणि स्त्रीपुरुषांमधले 'द्वंद्व' कायमचे संपवूनच टाका ना!

"स्त्रीमुक्तीचा उद्‌गाता ब्रह्मदेशीय वैयाकरणर्षी अग्गवंसा तुला शतशः प्रणाम!"

पण एक मात्र खरे की बाराव्या शतकातीलच ज्ञानदेव 'देवोदेवी' पर्यंतच्या समानतेला पोहोचले होते. तर इ.स. पूर्वीच्या कैक शतकातील औपनिषद ऋषिमुनी स्त्रीपुरुषपरतेपर्यंतची मजल गाठून म्हणत होते. "त्वं स्त्री, त्वं पुमानसि, त्वं कुमार उत वा कुमारी (श्वेताश्वतरोपनिषद् ४.३) आणि याही पुढे जाऊन श्वेताश्वतर ऋषी म्हणतात, "नैव स्त्री, न पुमाने न चैवायं नपुंसकः ।" (५.१०)

केवढी लिंगभेदनिरपेक्षता !

◇◇◇

**वाग्वैद्य मो. गो. धडफळे**
पुणे.

(Traces of Short E and O in Rgveda. ABORI. Vol. XXIX. Parts - 1-4-1948 PP. 1-20 I.1.209. महत्त्वाभ्दार)

---

## १ एप्रिल २०१०पासूनचे आजीव सभासद,

१) घोडके जालिंदर रामचंद्र, बारामती
२) जोशी अंकुर हेरंब, पुणे
३) जोशी हेरंब बाळकृष्ण, पुणे
४) पडवळ बबन खंडु
५) पडवळ मेघना खंडु
६) गोराड मीनल निवृत्ती
७) दातीर मदर नामदेव
८) पुजारी ज्योती मोहन
९) पानसे श्याम दिलीप, पुणे
१०) मोहोळ सुकुमार विश्वनाथ, सोलापूर
११) बुधाराम रेणुका पुरुषोत्तम, सोलापूर
१२) रसाळ पुंडलीक विठ्ठल
१३) फुंदे संजय रामराव, पाथर्डी
१४) खताटे अजय शेषराव, निपाणी
१५) बडे बाळासाहेब केशवराव, पाथर्डी
१६) गर्जे भागवत बन्सी, पाथर्डी
१७) विसपुते शिवाजी सावळाराम, लासंनगाव
१८) जाधव सुरेश विनायक, कुंभारी
१९) जाधव सुमिता माणिकराव, कुंभारी
२०) खैरे सुभाष रामचंद्र, वाहीगावसाळ
२१) दंडवते वसंतराव, लासलगांव
२२) शिंदे विश्वनाथ रघुनाथ, नासिक
२३) ओक शशांक दत्तात्रय, पुणे
२४) तोडमल वर्षा सतीश, पुणे
२५) सांगळे संदिप विठ्ठलराव, पुणे
२६) भणगे ज्ञानदेव वसंत, पुणे
२७) सारूक सुनंदा श्रीधर, पाथर्डी
२८) मरकड संजय मोहन, मठी, पाथर्डी
२९) खेडकर दत्तात्रय त्रिंबक, पाथर्डी
३०) बडे संतोष महादेव, पाथर्डी
३१) तिखे निलिमा नारायण, पुणे
३२) हावले विजयकुमार, इचलकरंजी
३३) मोरे जवाहर लक्ष्मण, सोलापूर
३४) शास्त्री सुभाष वर्धमान, सोलापूर
३५) स्वामी ईरश सदाशिव, सोलापूर
३६) मोहरकर राजकुमार, सोलापूर
३७) पाटील उज्ज्वला, सांगली
३८) साळुंखे कुमुदिनी सुर्याजी, धुळे
३९) जाधव संपत गणपत, पुणे
४०) पोटे देवीराज शंकर, ठाणे
४१) किरवले समाधान आश्रुबा, सिरसाळा
४२) दिवेगांवकर कौस्तुभ चंद्रप्रकाश, लातूर
४३) वैद्य सुनंदा माधवराव, धुळे
४४) शिंदे अरुण, मंगळवेढा
४५) गायकवाड लिलाधर बंडू, मुक्ताईनगर
४६) चव्हाण मोरसिंग गरदल, सातगांव डोंगरी
४७) तडवी श्रावण बाबूलाल, पाचोरा
४८) सूर्यवंशी माया बाबूराव, पाचोरा
४९) पाटील देसले दिलीप गोबाजी, पाचोरा
५०) प्रकाश भोईटे
५१) पराग करंदीकर
५२) प्रशांत अहिरे
५३) शशिकांत भागवत
५४) अमोल कुटे
५५) योगेश गोगावले
५६) राजेंद्र वाघमारे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# संत साहित्याचे सार सांगणारा कोश

## संत सुभाषित कोश : संपा. रा. शं. नगरकर

– डॉ. कल्याण काळे

*[कोशवाङ्मयांत मोलाची भर टाकणारा 'संत सुभाषित कोश' म्हणजे केवळ संकलन नसून संतहृदयाचे दर्शन घडविणारी वाङ्मयीन तपश्चर्या आहे. संत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या संतकविपंचकाच्या साहित्यसागरातून पाच हजार एकशे सत्तेचाळीस अल्पाक्षररमणीय, हितकारक अर्थाने वाचकाला जीवनाचा सुपंथ दाखविणाऱ्या, सुभाषित-वाङ्मयाचे साक्षेपी प्रासादिक शैलीतील विवेचन – समीक्षावाङ्मयालाही नवी दृष्टी देणारे आहे. डॉ. कल्याण काळे यांची, संपादकाच्या प्रस्तावनेची सुबोध आणि अभ्यासपूर्ण समीक्षा, कोशवाङ्मय आणि कोशकाराचे अंतरंग, हळुवारपणे उलगडून दाखविणारी आहे; आणि एक वेगळेच वाचनसुख देणारी आहे. –संपादक]*

जे. जे. स्केलिंजर या विद्वानाने कोशरचनेच्या संदर्भात म्हटलेले आहे, "एखाद्या मोठ्यातल्या मोठ्या गुन्हेगाराला शासन करायचे असेल तर फाशी अथवा दीर्घ मुदतीचा सश्रम कारावास असल्या शिक्षा देण्यात येतात. त्याऐवजी त्याला एखादा कोश करण्याचे काम द्यावे; त्या कामात या शिक्षेतील सर्व यातना समाविष्ट झाल्या आहेत." असे असतानासुद्धा श्री. रा. शं. ऊर्फ रामभाऊ नगरकर यांच्यासारखे अभ्यासक विद्वान कोणताही गुन्हा न करता स्वेच्छेने व आनंदाने कोशनिर्मितीच्या कार्यात सतत चाळीस वर्षे स्वत:ला झोकून देऊन गुंतवून घेत आहेत, हे पाहिल्यावर आश्चर्य वाटते.

रामभाऊंनी भारतीय संस्कृतिकोशात सतत २९ वर्षे नोकरी केली; त्यानंतर डॉ. मु. श्री. कानडे यांच्या सहकार्याने संत नामदेवांची गाथा, संत एकनाथांचे भागवत, संत तुकारामांची गाथा, संत रामदासांचे दासबोधेतर साहित्य या ग्रंथांचे शब्दार्थ-संदर्भकोश निर्माण करण्यात पंधरा वर्षे घालविली. त्यानंतर प्रस्तुतचा 'संत सुभाषित कोश' सतत तीन वर्षे परिश्रम करून पूर्ण केला. हे त्यांचे कार्य त्यांच्या कोशनिर्मितीच्या क्षेत्रातील योगदानाची व अधिकाराची ओळख करून देण्यास पुरेसे आहे. त्याशिवाय आतापर्यंत प्रसिद्ध झालेले त्यांचे बावीस ग्रंथ त्यांच्या विद्वत्तेची साक्ष देत आहेतच.

त्यांचा प्रस्तुतचा 'संत साहित्य कोश' हा एक आगळावेगळा ग्रंथ आहे. या कोशग्रंथाची जुळवाजुळव करण्यास त्यांनी एकोणिसशे नव्वद सालीच सुरुवात केली होती. वरील शब्दकोशांच्या निर्मितीत गुंतल्यामुळे त्याचे काम जरा मागे पडले होते. ते त्यांनी आता जवळ जवळ एकवीस वर्षांनंतर पूर्ण केले आहे.

या कोशात त्यांनी मराठीतील ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम आणि रामदास या सुप्रसिद्ध संतकविपंचकाच्या समग्र साहित्याचे आलोडन करून त्यातील सुभाषितांचे संकलन केले. एकूण पाच हजार एकशे सत्तेचाळीस सुभाषितांचे हे संकलन आहे. या सर्व सुभाषितांची एकशेसोळा विषयांत वर्गवारी करून त्या त्या विषयाखाली या सर्व संतांची तत्संबंधीची सुभाषिते विशिष्ट क्रमाने नोंदविली आहेत. या एकूण सर्व सुभाषितांमध्ये सर्वांत जास्त सुभाषिते ज्ञानेश्वरांच्या साहित्यातील आहेत. ती दोन हजार छत्तीस इतकी आहेत. त्याखालोखाल तुकारामांची नऊशे छप्पन सुभाषिते आहेत. त्यानंतर रामदासांचा क्रम लागतो. त्यांची सुभाषिते नऊशे चौपन्न एवढी आहेत. त्यानंतर एकनाथांची आठशे पंचाहत्तर सुभाषिते असून, नामदेवांची सुभाषिते तीनशेसव्वीस आहेत. हे सर्व विषय अकारविल्ह्याने लावलेले आहेत. या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

कोशाची व्याप्ती डबल क्राऊन आकाराची ५२ + ३८३ + ५ अशी एकूण ४४० पृष्ठे इतकी आहे. मुखपृष्ठावर सरस्वतीचे प्रतीक असलेल्या मयूरपुच्छाचे सुंदर चित्र आहे. त्यामुळे कोश देखणा झाला आहे. या कोशाला स्वत: रामभाऊंनीच सेहेचाळीस पृष्ठांची अभ्यासपूर्ण अशी प्रस्तावना लिहिली आहे.

या प्रस्तावनेत रामभाऊंनी प्रथम सुभाषित वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. मराठीमध्ये संतवाङ्मयातील वेच्यांचे अनेक संग्रह झाले, पण त्यातील सुभाषितांकडे कुणाचे फारसे लक्ष गेले नाही. केरळ 'कोकिळ'कर्ते कृ. ना. आठवले यांनी स्वत:च्या ज्ञानेश्वरी प्रतीत ज्ञानेश्वरीतील ३३६ सुवचने दिली आहेत. (इ.स. १९००), श्री. स. खं. अळतेकर यांनी इ.स. १९२६ मध्ये 'समर्थ सुभाषिते' या नावाचा कोश प्रसिद्ध केला आहे. श्री. चिं. नी. जोशी यांनी आपल्या 'श्रीधरचरित्र आणि काव्यविवेचन' या ग्रंथात 'श्रीधर कवीची सुभाषिते' समाविष्ट केली आहेत. (१९५१) डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी आपल्या लीळाचरित्राच्या संपादनात प्रत्येक खंडाच्या शेवटी त्या त्या खंडातील सुभाषिते एकत्र करून दिली आहेत. (१९६४-६७) हे काही अपवादात्मक प्रयत्न होत. संस्कृतातील सुभाषितांचे कोश अनेकांनी प्रसिद्ध केले आहेत. पण एखाद-दुसरा अपवाद वगळता सुभाषित या वाङ्मयप्रकाराची चर्चा कोणीच केली नाही. मराठीत अशी चर्चा थोडी फार विष्णुशास्त्री चिपळूणकर, न. चिं. केळकर, ना. म. भिडे इ. लेखकांनी केली आहे. पण रामभाऊंनी मात्र सुभाषित स्वरूपाची सांगोपांग चर्चा या प्रस्तावनेत केली आहे. सुभाषित म्हणजे नेमके काय, याचे स्वरूप काय, त्याची व्याख्या कशी करता येईल याची सविस्तर चर्चा त्यांनी केली आहे. 'सुभाषित' या शब्दाचा सुंदर भाषण, भाषेचा सुंदर आविष्कार असा अर्थ होतो, पण जगातील सर्वच सुंदर वाङ्मय या संज्ञेला पात्र ठरेल, ते वर्णन अतिव्याप्त ठरेल, म्हणून सुभाषिताचा परंपरेने स्वीकारलेला रूढ अर्थ घ्यावा लागतो. सुभाषित हे पूर्वापर संबंधाशिवाय परिपूर्ण अर्थ देणारी स्वतंत्र स्फुट रचना असते. संस्कृतमध्ये अशा स्फुट रचनेला मुक्तक अशी संज्ञा आहे. मुक्तकत्व हे त्याचे बाह्य लक्षण झाले; पण ते पूर्णांशाने संस्कृतमधील सुभाषितांनाच लागू पडते. क्वचित 'गाथासप्तसई'सारख्या गाथांनाही ते लागू पडेल. मुक्तक रचना ही प्रामुख्याने पद्यातच आढळते. गद्यात ती आढळत नाही. मराठीत सुभाषित हे गद्य स्वरूपातही आढळते. लीळाचरित्रातील काही वाक्ये, बखरीतील काही वाक्ये, आज्ञापत्रातील काही वाक्ये ही सुंदर सुभाषिते आहेत, पण त्यांना मुक्तक म्हणता येणार नाही.

वरील बाह्यलक्षणांखेरीज सुभाषितात काही अंगभूत गुणही असावे लागतात. बाणभट्टाने गाथासातशतीचे वर्णन 'अविनाशिनमग्राम्यकरोत्सात वाहन: । विशुद्ध जातिभि: कोशं रत्नैरिव सुभाषितै:'' या शब्दात केले आहे. त्याच्या मतानुसार अविनाशी, अग्राम्य अशी सुंदर रचना म्हणजे सुभाषित होय. सुभाषितात शाश्वत सत्याचे प्रतिपादन असले पाहिजे. ते भाषेतील अक्षर वाङ्मय ठरले पाहिजे. त्यामुळे तत्कालिक स्वरूपाची ऐतिहासिक विधाने सुभाषित म्हणून स्वीकारता येणार नाहीत. 'मेरी झाँसी नहीं दूँगी', 'बचेंगे तो और भी लडेंगे' अशा वाक्यांना सुभाषित पदवी देता येणार नाही. दुसरे लक्षण म्हणजे ते अग्राम्य म्हणजे सदभिरुचिसंपन्न असले पाहिजे. संस्कृतच्या 'सुभाषितरत्न भांडागारम्' यासारख्या कोशात निम्म्याहून अधिक तथाकथित सुभाषितांमध्ये उत्तान शृंगारिक वर्णने आहेत. 'गाथासत्तसई'मधील बऱ्याचशा रचना चावट शृंगाराच्या आहेत. त्यामुळे त्यांना सुभाषित म्हणून मान्यता देता येणार नाही. समर्थ रामदासांनी अशा काव्याला 'धीट पाठ' म्हणून तुच्छ लेखले आहे. तरी संस्कृतमध्ये त्या प्रकारच्या काव्याला प्रतिष्ठा कशी मिळते? खुशालचेंडू सरंजामदार, चैनीला चटावलेले श्रीमंत अशा लोकांच्या खुशामतीसाठी असे वाङ्मय निर्माण



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

होत असते, असे डॉ. डी. डी. कोसंबी यांनी म्हटलेले आहे. त्यात तथ्यांश आहे. मराठीतील लावणीवाङ्मयही याच प्रकारात मोडते.

अग्निपुराणात सुभाषिताचे वर्णन पुढीलप्रमाणे केलेले आहे.

*'संक्षेपाद्वाक्यमिष्टार्थं व्यवच्छिन्ना पदावली ।*
*काव्यं स्फुरदलंकारं गुणवद्दोष वर्जितम् ।।'*

त्यानुसार सुभाषित हे संक्षिप्त म्हणजे अल्पाक्षर रमणीय असले पाहिजे. त्यात इष्टार्थ म्हणजे हितकारक अर्थ असला पाहिजे. त्यात अलंकार असले पाहिजेत; आणि ते गुणांनी युक्त दोषरहित असले पाहिजेत. अर्थात हे वर्णन पद्यरूप अशा सुभाषितांनाच लागू पडणारे आहे. पण गद्यातही सुभाषिते असू शकतात, त्यांना हे वर्णन कितपत लागू पडेल याची शंका आहे.

साहित्यामध्ये अनेक वचने सुंदर म्हणून प्रसिद्ध असतील, पण त्या सगळ्यांनाच सुभाषित म्हणून गौरविता येणार नाही. गीतेचा शेवटचा श्लोक

*"यत्र योगेश्वर कृष्णोयत्र पार्थो धनुर्धर:*
*तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।।"*

असा आहे. एक तर ते संजयाचे वैयक्तिक मत आहे. दुसरे म्हणजे ते श्रीकृष्ण आणि संजय या तात्कालिक व्यक्तिरेखांच्या संदर्भात आहे. त्यामुळे त्याला सुभाषित म्हणता येणार नाही. भवभूतीच्या उत्तररामचरित्रातील, 'स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि । आराधनाय लोकानां मुञ्चते नास्ति मे व्यथा ।।' हा अतिशय सुप्रसिद्ध श्लोक आहे. पण त्याला सुभाषित म्हणता येणार नाही. कारण तो रामाचा व्यक्तिगत निर्धार आहे. त्याला सार्वत्रिक मूल्य नाही. समर्थांच्या पदांमध्ये 'गिरीचे मस्तकी गंगा । तेथुनी चालली बळे । गर्जता मेघ तो सिंधु ध्वनिक लोळ उठिला'' इ. पद आहे. ते सुंदर आहे; पण ते वर्णनात्मक असल्याने त्याच्यात हितकारकत्व हा गुण उतरत नाही, म्हणून ते सुभाषित नव्हे. समर्थांचेच 'धावरे रामराया' हे पदही कितीही गोड असले तरी त्याला सुभाषित म्हणता येत नाही. कारण ती केवळ आळवणी असल्याने तिला तो मान देता येत नाही. रामभाऊंनी अशा प्रकारची अनेक उदाहरणे देऊन सुभाषित कशाला म्हणावे आणि कशाला म्हणू नये याचा चांगला ऊहापोह केला आहे. तो मुळातच वाचला पाहिजे.

आणखी एक प्रश्न रामभाऊंनी प्रस्तावनेत उपस्थित केला आहे. म्हणींना सुभाषिते म्हणता येईल का? काही अभ्यासकांना ते मान्य नाही. उदा. ना. म. भिडे म्हणतात, "म्हण व सुभाषित हे एक समजणे म्हणजे त्यांच्यामधील मूळ तत्त्वभेदाकडे दुर्लक्ष केल्यासारखे होईल." त्यांच्या मते सुभाषितात काव्यालंकार असतात. म्हणीमध्ये ते नसतात. पण हेही विधान खरे नाही. कारण म्हणींमध्येही यमक, अनुप्रास इ. अलंकार असू शकतात. पण म्हणी या फक्त दृष्टान्तापुरत्याच मर्यादित असतात. त्यांच्या दार्ष्टांतिकाबद्दल म्हणी सांगत नाहीत. पण सुभाषिते म्हणजे संपूर्ण विधान असते. थोडक्यात असे म्हणता येईल, की सर्वच म्हणींना सुभाषित म्हणता येणार नाही, आणि सर्वच सुभाषितांना म्हणींमध्ये मांडता येणार नाही. 'काव्येषु नाटकं रम्यम्' या सुभाषिताला म्हण कसे म्हणता येईल किंवा 'मरावे परी कीर्तिरूपे उरावे' हे सुभाषित 'म्हण' कसे होईल? तेव्हा 'म्हण' आणि 'सुभाषित' हे वेगवेगळे वाङ्मयप्रकार आहेत, असे म्हणावे लागते.

रामभाऊ म्हणीप्रमाणेच लौकिक न्यायालयालाही सुभाषिताचा दर्जा देऊ पाहत आहेत. पण लौकिकन्यायाचे स्वरूप पारिभाषिक संज्ञेचे आहे. सुभाषित हे पूर्ण विधान असते. हा दोहोंतील फरक लक्षात घेतलाच पाहिजे.

रामभाऊंनी संस्कृत वाङ्मय, मध्ययुगीन संत-वाङ्मय, गद्य वाङ्मय यांचा शोध घेऊन त्यातील सुभाषितांचे अस्तित्व दाखवून दिले हे ठीकच





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

झाले; पण आधुनिक वाङ्मयातील सुभाषितांकडे त्यांचे दुर्लक्ष झालेले दिसते. ''पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना रम्य भाविकाल'', ''रात्रीच्या गर्भात उद्याचा असे उष:काल'', ''जग हे बंदीशाळा'', ''बोरिबाभळी उगाच जगती चंदनमाथि कुठार'' अशी कितीतरी अर्थपूर्ण सुभाषिते आपल्या कानी पडत असतात. रामभाऊंना त्यांचे सुभाषितत्व मान्य असणारच. पण विस्तारभयास्तव त्यांनी आपला हात आखडता घेतल्याचे दिसते.

आता प्रस्तुत संग्रहातील सुभाषितांच्या निवडीच्या संदर्भात काही शंका जाणवतात, त्यांचा निर्देश करतो. नामदेव गाथेतील ''अनुसरे त्यासी फिरो नेदी मागे'' (११७५) असे एक वचन या संग्रहात घेतले आहे. सुभाषित जर पूर्वापर संदर्भ नसलेले मुक्तक काव्य असेल तर वरील वचन संदर्भनिरपेक्ष आहे काय? याचा विचार करावा. येथे 'परमेश्वर' हा कर्ता अव्यक्त आहे. या कोशातील पहिलेच सुभाषित असे आहे, ''जैसा अपमानिला अतिथि। ने सुकृताची संपत्ति''

हे सुभाषित संपूर्ण विधान नाही असे वाटते. कारण ते केवळ उपमान वाक्य वाटते. त्याला उपमेय वाक्यावाक्याची अपेक्षा आहे. त्यामुळे ते स्वयंपूर्ण नाही. त्यातील ''जैसा'' हा शब्द गाळला तर मात्र ते सुभाषित होऊ शकेल. नामदेव गाथेतीलच 'मी तूं पण जव दंभ गेला नाही ।' (ना. गा. १०५९) हे सुभाषितही असे स्वतंत्र नाही. तोपर्यंत परमेश्वर भेटणार नाही या मुख्य विधानाची ते अपेक्षा करते. अशी अपूर्ण विधाने या कोशात आढळतात. रामभाऊंनी खाली अर्थात् अपेक्षित उत्तरार्ध दिला नसता तर केवळ त्या उदाहरणांना पंगुत्व आले असते असे वाटते. तसेच 'कां वाकुडिया ढोरे बैसली।' (ज्ञा. १३. ५६५ पृ. १४०) या वचनाला सुभाषित का म्हणावे असा प्रश्न पडतो. ते विधानही अपूर्ण वाटते. असो, अशी काही विधाने आढळली तरी त्यामुळे या कोशाच्या महत्त्वाला आणि उपयुक्ततेला काही उणेपणा येणार नाही, हे निश्चित!

रामभाऊंचा हा कोश मराठीतला या प्रकारचा पहिलाच कोश होय. त्यासाठी त्यांनी निवडलेल्या संतांचे सर्व वाङ्मय डोळ्यांखालून घातलेले आहे. ते खूपच मोठे काम होते. त्यासाठी मानेला, पाठीला अगदी रग लागेपर्यंत बसण्याची तयारी असावी लागते. रामभाऊंनी ही तपस्या केली आहे. त्याबद्दल त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन! त्यांच्या या शारीरिक कष्टांबद्दल कणव येऊन नगरकर वहिनी त्यांच्या मदतीला धावून आल्या आणि त्यांनी आपला गृहिणीधर्म कर्तव्यभावनेने पार पाडला त्याबद्दलही त्यांचे अभिनंदन.

या कोशाच्या निमित्ताने मराठीतील सर्व संतपण साररूपाने वाचकांच्या समोर साक्षात उभे राहते, हा वाचकांच्या दृष्टीने फार मोठा लाभ मानावा लागेल. रामभाऊंनी या कोशाची निर्मिती करून मराठी सारस्वताची फार मोठी सेवा केली आहे. असा सर्वसंग्राह्य कोश दिल्याबद्दल वाचक त्यांचे सदैव ऋणी राहतील.

◇◇◇

**संत सुभाषित कोश**
**संपादक – श्री. रा. शं. नगरकर,**
डायमंड पब्लिकेशन्स
पुणे, ऑगस्ट २०११.

**डॉ. कल्याण काळे**
दि. ४/११/२०११
ए-५, प्रज्ञानगड, नवश्या मारुती गल्ली,
वीटभट्टी, सिंहगड रस्ता.
पुणे - ४११०३०.
दूरभाष – (०२०) २४२५३१३६.





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## साक्षात्कारी लेखनप्रवास!

– सौ. अनघा अनिल ठोंबरे

*[लेखन हे केवळ भावनांचे विरेचन नाही. लेखन ही संकल्पना केवळ लेखकाशीच किंवा लेखनिकाशीच जोडली गेलेली नाही. 'दिसामाजी काहीतरी ते लिहावे ।' असे समर्थ रामदासांचे वचन आहे. त्याचा मनोव्यापाराशी संबंध आहे. 'मना सज्जना'ने लेखनाच्या माध्यमातून मनाशीच संवाद साधला, की आत्मभानाची प्रक्रिया सुरू होते. आपल्यातला 'आपण' शोधण्याचा मनाचा हा प्रवास एक आगळावेगळा 'लेखनानंद' देईल. हा 'लेखन रियाज'च कळत, नकळत उत्कंट साहित्यनिर्मिती करील. लेखनप्रवासातच 'आत्मसाक्षात्कारा'चे रहस्य दडलेले आहे! विदग्ध साहित्यनिर्मितीची ही 'गुह्यतम' वाटचाल प्रस्तुत लेखात प्रकट होऊ पाहत आहे. मनोविश्लेषणात्मक समीक्षेचा तो एक आधार आहे.*

*– संपादक]*

मानवी संस्कृती आणि विकासाच्या इतिहासात लेखनकलेची निर्मिती आणि विकास हा महत्त्वाचा टप्पा आहे. भाषेच्या प्रगतीवरचं ते एक दमदार पाऊल होतं. प्रथम रेघोट्या, नंतर चित्र, त्यानंतर चिन्ह, अक्षरांची रचना झाली असावी. दगडावर, वस्त्रावर, गुहांच्या भिंतीवर नंतर भूर्जपत्र, तालपत्रांवर अक्षरं लिहिली गेली. लेखणीच्या प्रकारातही अनेक प्रयोग झाले. अनेक पिढ्यांची तपश्चर्या चिंतन, मनन आणि अविरत श्रम त्यामागे होते. कागदाचा शोध, छपाईचा शोध, टंकलेखन, संगणकावर लेखन, 'एसएमएस' अशी प्रगतीची भरारी आहे. लेखणी आणि लेखनतंत्रातही पुराव्याच्या कागदाला माणसापेक्षा जास्त महत्त्व आलं. प्रथम धार्मिक गोष्टी, इतिहास, हिशेब वगैरे लिहिणारे लोक फार थोडे होते. वाचणारेही अगदीच कमी. लेखन-वाचन सामान्यांच्या जीवनात फार उशिरा आलं. लिहिणाऱ्यांना मान होता. हस्तलिखित पोथ्या, जपच प्रथम लिहिले गेले असावेत. सामान्य माणूस व्यक्तिगत जीवनात पत्रं, दैनंदिनी लिहू लागला. त्यासाठी कित्येक शतकं जावी लागली. मग अन्य भाषा, लिपी, त्यात लेखनही सुरू झालं.

वाचन आणि लेखन यांचा उपयोग संपर्क माध्यम, संवाद, मनोरंजन माहिती, ज्ञान, शिक्षण, प्रचारप्रसार अशा असंख्य गोष्टींसाठी होऊ लागला. अनेकांना लेखनाचा कंटाळा, आळस असतो, दोन ओळी लिहिणंही जमत नाही, दहावीच्या परीक्षेनंतर मातृभाषेत लिहिणं संपतं आणि बारावीनंतर तर कागदाला पेन लावायची वेळच येत नाही. सगळं लिहिणं संगणकावर, सुशिक्षित घरात शाळा-कॉलेजात जाणारी मुलं नसतील तर पेन मिळणं कठीण, सहीपुरतंच कधीतरी लागतं. काही थोडे लेखक असतात ते अनेक प्रकारचं साहित्य लिहितात. कविता, कथा, कादंबऱ्या, नाटकं, मालिकांच्या कथा, गाणी, पटकथा, विनोद, विविध विषयांवरचे लेख, जाहिराती, अनुवादित पुस्तकं, लघुकथा, वृत्तपत्रीय लेखन, वाचकांचा पत्रव्यवहार, भविष्यलेखन प्रतिक्रिया, प्रतिसादलेखन, चारोळ्या, हायकू, चरित्र, आत्मचरित्र, संशोधनपर लेखन आणि कितीतरी, ते लेख वाचले जातात. खरं तर आता वाचनही कमी झालं आहे. ते लेख दृश्य माध्यमातून 'पाहिले' जातात, श्राव्य माध्यमातून ऐकले जातात. प्रत्यक्ष लेखन करणारे फारच विरळ असतात. पूर्वी माणूस निदान खुशालीची, निमंत्रणांची, वार्तांची पत्र तरी लिहीत होता. आता फोन, मोबाईलमुळे ते युग संपलं आहे. कितीतरी पत्रं व्यक्तिमत्त्वाची प्रतिबिंबं आहेत, काळाचा संदेश देणारी आहेत, भावना व्यक्त करणारी आहेत.

वैयक्तिक जीवनात लेखन एक छंद म्हणून



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

करणारे लोक अगदी थोडे असतील. हिशेब लिहिणं, धार्मिक लेखन करणं, फार तर पाकक्रिया लिहिणं एवढ्यापुरताच लेखनाशी संबंध अनेकदा येतो. दैनंदिनी लिहिणं किंवा चांगले विचारस्तोत्र यांचा संग्रह करून लिहिणं या गोष्टीही आता कालबाह्य झाल्या आहेत. आपण जर लिहिते झालो तर आपलं संपूर्ण व्यक्तिमत्त्वच अधिक परिपक्व, परिपूर्ण व्हायला मदत होते. लिहिणं आपल्या मर्जीनुसार! कधी प्रतीक्षेचे, वियोगाचे, निराशेचे क्षण येतात त्या वेळी आपलं मनोगत लिहिलं तर ते क्षणही हलके होतात, मनावरचं ओझं कागदावर उतरतं. कोणाला दाद देणारे, कौतुक करणारे शब्द लिहून पाहा, लेखनातून माणसांना खऱ्या अर्थानं भेटता येतं. सोपी, सहज, सर्वांना येणारी कला. त्याला वेगळं कौशल्यही लागत नाही. कंटाळ्याचे, उदास क्षण, वार्धक्यातला न संपणारा दिवस आणि भराभर संपणारी वर्षं. यात लेखनकला खूप साथ देते. लेखनानं (ग्रहण) शक्ती ताजीतवानी होते, बुद्धीला गंज चढत नाही. मेंदूला व्यायाम होतो. विचारांच्या शृंखलेतले निसटलेले दुवे लिहिता लिहिता सांधले जातात. अस्वस्थ, कातर मन:स्थितीत लेखनाचा आधार असतो. लेखन करताना वृत्ती ताजातवान्या होतात. अनेक वर्षांनी आपण लिहिलेलं आपल्याला वाचायलाही मजा येते. शाब्दिक भेटही कुणाला देता येते. गाणाऱ्याचा गळा जसा गाता गाता तयार होतो, तसा लेखनालाही रियाज आवश्यक असतो. लिहायचं आहे म्हटल्यावर वाचणं, ऐकणंही मन:पूर्वक होतं. कधी एखादा विषय झपाटून टाकतो, लिहायला मन आतुर होतं. आपल्यातला लेखक जागृत असला, की लेखनाची रुजलेली बीजं मनातून उगवून येतात आपोआप! इथे स्पर्धा नसतेच. असली तर स्वत:शीच! लेखनातून आसपासच्या घटनांचा अर्थ उमगत जातो. कधी मनातलं दाटलेलं आभाळ मोकळं होतं. मनाविरुद्ध गोष्टी घडतात, अपेक्षाभंग, अन्याय असतात. कधी असहाय्यता अगतिकता असते, कागदावर सगळं उतरवायचं! कागद आणि लेखणीशी मैत्रीचे धागे जमतात. वृत्तीतली सुस्ती, मरगळ, आळस दूर होतो. विचारमंथन सुरू होतं. जर लेखकाला वाचक, चाहते मिळाले तर सोन्याला सुगंधच! अशी मैत्रीची पर्वणीच सुरू होते. दडलेल्या भावना अक्षरातून उमटायला लागतात. लेखन हा एक आनंदयोग, आनंदयात्राच असते. स्वत:साठी लिहिता लिहिता समाजकार्याच्या हेतूनं काही लिहिलं तर त्यालाही प्रतिसाद मिळतो, प्रसिद्धीही मिळते. भरकटलेलं मन थाऱ्यावर येतं. प्रतिकूल भावना, द्वेष, लोभ, सूड या निवळतात. लिहिताना नव्या कल्पना सुचत जातात, आत्मपरीक्षणाची सवय लागते. स्वत:चंच प्रतिबिंब आपल्या लेखनात आढळतं आणि 'प्रत्यक्षाहून प्रतिमा उत्कट' अशी अनुभूतीही येते. लिहिताना स्मरणशक्ती तल्लख होते. अनुभव, आठवणींच्या खजिन्याची दालनं उघडली जातात. स्वत:चं आणि इतरांचं मूल्यमापन लिहिताना होत राहतं. लेखनातून अनेक गुंतागुंतीचे प्रश्न सुटत जातात, उत्तरं सापडत जातात. लेखन अनेकदा संभाषणापेक्षा संवाद, समन्वय, समझोता अधिक प्रभावी रीतीनं करू शकतं. उतावळे, अधीरे, आक्रस्ताळे, तत्कालिक विचार कागदावर उतरल्यावर अधिक समजूतदार होतात, संघर्षाची धार बोथट होते. आपला आतला आवाज, आपल्यातले 'आपण' अनेकदा लेखनात सापडत जातो. प्रसिद्धी, प्रतिष्ठा, पद या सर्वांपलीकडचा आनंद मिळविण्यासाठी स्वान्त:सुखाय केलेली कृती म्हणजे लेखन. अपार समाधान मिळते जेव्हा चांगलं काही लिहिलं जातं, चांगल्या वाईटाचे परीक्षक आपणच.

एकांतात, एकटेपणात लेखणी साथ देते. दु:खदायक, निराश करणाऱ्या घटना, अपयशाचे कडू घोट, अपराधीपणाची जाणीव, घायाळ करणारी शल्यं कागदावर उतरवल्यानं सौम्य होतात. क्षणात उसळलेल्या भावनांचं व्यवस्थापन लेखनातून करता येतं. लिखित गोष्टी नियोजनपूर्वक व्यवस्थित पार पाडता येतात. लेखनातून माफी मागणं, दिलगिरी व्यक्त करणं, क्षमा करणं, स्वीकार करणं अधिक



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

सोपं, सहज वाटतं. आपुलकी आस्था, जिव्हाळा व्यक्त करायला अनेकदा लेखणी मैत्रीण होते. लेखन उत्कृष्ट छंद आणि स्वत:चं मन रिझविण्याचा एक विरंगुळा असतो. लेखनानं माणसं जोडता येतात, त्यांच्या मनाचा ठाव घेता येतो. लेखनातून समजून घेता येतं, समजावून सांगता येतं, समर्थनही करता येतं. लेखकांना एक दिव्य दृष्टी येते. ज्यामुळे माणसं जाणता येतात, माणसांच्या वागण्याचा अर्थ लावता येतो, त्यांचा इतिहास, परिस्थिती समजून प्रतिक्रिया व्यक्त करता येतात, मनं जोडली जातात. लेखनातून परिपक्वता येते. गेलेला तोल सावरायला लेखणी उपयुक्त ठरते. आयुष्यात लेखनानं एक सावली, समाधान मिळतं, लेखन चैतन्य, सामर्थ्य देतं, अंतर्मुख करतं. सारासार विचार लेखनातून येतो, तारतम्य लेखनातून मिळतं. लेखन संयम शिकवतं, धीर धरायला शिकवतं. ठाम, स्थिर राहायला मदत करतं. पण लेखणी इतरांची नव्हे स्वत:ची! भ्रम, गोंधळ, गैरसमजाच्या आडवळणांना लेखनकला साथ देते. लेखन आपल्याला स्मरण करून देतं, आत्मभानही देतं; कृतज्ञता देतं. लेखन मनात एक शांती, समाधान निर्माण करतं. सांत्वन करतं, दिलासा देतं, उभारी देते, दु:ख हलकं करतं, क्रोधाचा अग्नी शांत करतं. सहजसोपी कला प्रत्येकाला येणारी. लिहिताना वेळ कसा जातो ते समजत नाही. पुन्हा तुम्ही लिहिलेलं सर्व एक निष्काम कर्मयोग असतो. फळाची आशा नाही, अपेक्षा नाही, त्यामुळे अपेक्षाभंगही नाही. लेखणीला नवनवे विषय सापडत जातात, जुन्या विषयातला नवा आशय मिळत जातो. त्याकरिता लेखक, सुप्रसिद्ध प्रथितयश लेखक आपण असण्याची आवश्यकता नाही, आपण आपल्यापुरते लेखक होणं हेही आनंदमय असतं. लेखनाची समाधी लागते. अनेक विषय 'माझ्यावर लिही' म्हणून अवतीभवती जमतात, कल्पना सुचतात. कधी लिहिताना झपाटल्यासारखं होतं. किती लिहू नि काय लिहू, शब्द भेटत राहतात, नवनवी रूपं घेऊन. समाजाशी धागेदोरे लेखनातून जोडता येतात. स्वत:ला काय वाटलं, काय भावलं, कुठे खटकलं, काय चुकलं हे लिहिताना सापडत जातं, न पटणारं पटत जातं, नाण्याची दुसरी बाजू समजत जाते. मनातली उदासीनता मळभ दूर होतं. आर्तता व्यक्त करता येते. अनेकदा स्वत: लिहिलेलं स्वत:लाच आवडत नाही, मग चक्क फाडून टाकायचं, परत लिहायचं.

लिहिताना मन पिसासारखं हलकं होतं, कधी तरंगत राहतं, लेखनाची भट्टी नेहमीच काही जमत नाही. काहीतरी कृत्रिम, पोकळ बालिश लिहिलं जातं. आपण कळतनकळत आपलं नातं जोडतो विश्वातल्या अंतिम शक्तीशी. लेखणीला धार येते, ती प्रभावी होत राहते. बाकी काही नाही तरी 'जीने का बहाना' जगण्याचं तत्त्वज्ञान लेखनातून सापडत राहतं. कष्ट, ताणतणाव हलके होतात. मैत्री, नाती जोडली जातात. एक निरंतर प्रयोग असतो लेखनप्रवास.

लेखनाचा छंद परावलंबी नाही. कधीही लिहावं. स्पर्धासाठी लिहायचं, सहज सुचलं म्हणून लिहायचं, काही चांगल्या वचनांचा संग्रह करायचा, काही छान लिहिलं गेलं की स्वत:ला दाद द्यायची, लेखनविश्वात इतरांनाही सामील करून घ्यायचं, लेखकांची मांदियाळी तयार करायची यासारखा आनंद नाही. कुणाची प्रशंसा, कुणाचं कर्तृत्व, कुणाची सुखदु:खं यावर लिहायचं एक प्रसन्न वातावरण निर्माण करता येतं. अभिनंदन, कौतुक लिहिल्यानं आनंद वाटतो. स्वप्नंही लेखनाचीच असतात. भूतकाळाची स्मरणयात्रा भविष्याचा वेध, वर्तमानातलं वास्तव लेखनातून सर्व काळांना स्पर्श करता येतो, प्रतिमा उजळली जाते. लेखन आहे साक्षात्कारी अनुभव!

❖❖❖

**सौ. अनघा ठोंबरे**
१/१३ सहजानंद सोसायटी,
कोथरूड, पुणे - ४११ ०३८.
दूरभाष – (०२०) २५३८२६३३, ९६७४२७९२७९



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# सामाजिक दृष्टिकोनातून प्रसारमाध्यमांची भाषा

– सुप्रिया सुभाष आवारे

*['येन केन प्रकारेण । प्रसिद्ध पुरुषो भवेत् ॥' या न्यायाने 'येन-केन प्रकारेण उपयुक्त भाषा भवेत्' हीं विद्यमान जाहिरातयुगाच्या संज्ञापनाची भाषा आहे. हा अतिउपयुक्ततावाद भाषेचा आत्मा तर संपवीत नाही ना? प्रासादिक भाषेवर होत असलेले हे आक्रमण, नव्या संपर्कमाध्यमांमुळे अधिक प्रभावी होत आहे; कारण 'सुलेखना'ची जागा संगणक, भ्रमणभाष यांनी आक्रमिली आहे. कर्ता-कर्म-क्रियापदांच्या जागांची अदलाबदल, शब्दांची मोडतोड (किंवा नवी जडणघडण), बंबय्या मराठी, 'क्या रे बाबा! तू कायकु आसं करत्यो? टायमपर का नाई येत तू?' ही 'बोली' आपल्याला कोणते सांस्कृतिक संचित देऊ पाहते आहे? ज्ञानदेवांनी देवभाषेविरुद्ध बंड करून 'अमृतातेही पैजा जिंके' अशा प्राकृत मराठीची प्रतिष्ठापना केली. भाषेने एक सामाजिक क्रांती घडवून आणली. नव्या माध्यमांची भाषा आपल्याला काय देणार आहे? नवी माध्यमव्यवस्था आणि समाजव्यवस्था यांनी भाषिक जाण ठेवणे आवश्यक आहे. याची जाणीव देणारा हा लेख.*

*– संपादक]*

आज भाषा व्यवहार व माध्यम व्यवहार यांच्यातील परस्पर संबंधामधून भाषेचे नवे रूप आकार घेताना दिसते. साधारणत: वृत्तपत्र, आकाशवाणी, दूरदर्शन संच, नियतकालिके, इंटरनेट या प्रसारमाध्यमांमधून ही भाषा वापरली जाताना दिसते.

**भाषा व्यवहार व समाजभाषा :**

प्रथमपासूनच मानवाची एकमेकांशी संपर्क साधणे ही मूलभूत गरज राहिलेली आहे. दोन अथवा अधिक व्यक्तींमधील संवादप्रक्रियेने सामाजिकीकरणाच्या प्रक्रियेला गती मिळाली किंवा असेही म्हणता येईल की समाजाच्या जडण-घडणीबरोबर संवादाची माध्यमेही बदलत गेली. मानवी जडण-घडणीची भाषा व संवाद माध्यमाचा स्वीकार हा महत्त्वाचा टप्पा होय. कारण यापूर्वीच्या चित्र, खाणाखुणा या माध्यमातील भाषेपेक्षा ध्वनींच्या भाषेमुळे, सार्वत्रिक पातळीवर आदान-प्रदानासाठी अथवा समाजधारणेसाठी संकेत व्यवस्था अस्तित्वात आणणे, मानवाला शक्य झाले. त्याचबरोबर संज्ञापनाच्या क्षेत्रात सूक्ष्मता, व्यापकता, विशालता, स्थिरता इ. विशेष ध्वनींच्या भाषेमुळे शक्य झाले. भाषाव्यवहार घडत असताना स्वीकारक व प्रेषक यांच्या परिस्थितीनुसार भाषा वापराचे माध्यम ठरत असते. ही आंतरप्रक्रिया सामाजिक वर्तुळामध्ये होत असते. त्यामुळे त्यास सामाजिक संदर्भ असणे साहजिक आहे. समाजभाषा अभ्यासक 'फर्थ'चे मतदेखील असे आहे, की प्रत्येक भाषिक वर्तनाला सामाजिक संदर्भ असतो. वास्तवाचा अनुभव घेण्याच्या प्रक्रियेतील कार्यरत घटक म्हणून भाषा वावरत असते. त्यामुळे त्यावर साहजिकच समाजातील बदल, व्यक्ती, लिंग, जात, वय, धर्म, संस्कृती, राजकारण, परंपरा, माध्यम या बाबींचा परिणाम होत असतो. या परस्परसंबंधातूनच भाषा आणि समाज यांच्यातील संवादाचे स्वरूप, माध्यम व काळ यानुसार बदलत असते.

समाजामध्ये काळाबरोबर संपर्कासाठीची माध्यमे विकसित होत गेली. सुरुवातीला हावभावांच्या रूपात असणारी भाषा पुढे चित्र, अंक, ध्वनी, लिपी या माध्यमातून विकसित होत गेली. आज माध्यमांमधून वापरली जाणारी भाषा हे भाषेचे एक बदललेले रूप आहे. माध्यमांच्या व्यावसायिक हेतूने माध्यमांमधील भाषेचे स्वरूप बदलते. समाजातील प्रत्येक थरापर्यंत पोहोचणे, त्यांच्याशी आपुलकीचा संवाद साधणे आणि त्यायोगे आपल्या उत्पादनाचा खप वाढविणे या



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

व्यावसायिक हेतूने हा बदल होत असतो. कमीत कमी शब्दांत अधिकाधिक आशय जास्तीत जास्त लोकांपर्यत् पोहोचवणे गरजेचे असते. यशस्वी संवादासाठी, माध्यमे सतत प्रगत वाटा शोधत आली आहेत. माध्यमे मुद्रण, चित्ररेखाटन, ध्वनिफीत, श्राव्य (Audio), दृक्‌श्राव्य (Audio-Video) आणि आता त्रिमितीय चित्रे अशी काळाबरोबर बदलत व विकसित होत गेली आहेत.

माध्यमांमधील भाषा ही एका अर्थी आकर्षक, कमी जागा व्यापणाऱ्या व सर्वांना कळणाऱ्या चिन्हांची भाषा असते. त्रिमिती चित्रे, पुराणातील व समाजातील सर्वमान्य, लोकप्रिय पात्रे, सर्वमान्य प्रतिमा व 'लोगो' ही त्याची उत्तम उदाहरणे आहेत. यांच्या व विद्युत उपकरणांच्या साहाय्याने लोकांशी तांत्रिक संवाद साधण्याची प्रक्रिया तांत्रिक युगातील माध्यमे करत असतात. या माध्यमांमध्ये वापरली जाणारी भाषा आणि रोजच्या व्यवहारामध्ये वापरली जाणारी ध्वनींची भाषा यांच्यामध्ये फरक असतो. मीनाक्षी रमण आणि संगीता शर्मा यांनी हा फरक स्पष्ट करून दाखविला आहे. त्यांनी सांगितलेल्या फरकानुसार, तांत्रिक संवादाचे स्वरूप सामान्यत: औपचारिक असते. सामान्य संवादाचे ठराविक आकार निश्चित नसतात. तर तांत्रिक संवादाची रचना निश्चित आकारांनुसार केली जतो. सामान्य संवाद मौखिक असून ठरविक समुदाय नजरेसमोर असतो. तर तांत्रिक संवादाचे स्वरूप मौखिक आणि लिखित अशा दोन्ही स्वरूपांचे असते. त्याची रचना ठराविक समुदायासाठीच केलेली असते. त्यामध्ये वारंवार आलेख, परिभाषा व इतर तांत्रिक बाबींचा वापर केला जातो.[१] केवळ वाघ या प्राण्याचे द्विमिती चित्र आणि त्याच्या सोबत 'कडक आणि दमदार वाघ बकरी चहा दमदार लोकांसाठी' ही छोटी पण बोलकी ओळ माध्यमामधील भाषेचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठीचे उदाहरण म्हणून पाहता येईल. सध्याचे युग या माध्यमांनी व तिच्या भाषेने आक्रमिलेले आहे. त्यामुळेचं हे युग 'जाहिरात युग', 'माध्यम जग', 'टेक्नो कल्चर' यांसारख्या संबोधनांनी ओळखले जाते. माणसाच्या दैनंदिन आयुष्यावर या माध्यमांनी परिणाम केलेला आहे. माध्यमांनी आपले स्वतंत्र जग स्थापन केलेले आहे. या जगाची स्वतंत्र संस्कृतीही अस्तित्वात आलेली आहे. वस्तू वापरा, वापरा आणि फेकून द्या, सतत बदलत राहा, आकर्षित करा, आकर्षक दिसा व राहा, खूप माहिती मिळवा, स्वत:ला सार्वजनिक ठिकाणी व्यक्त करा, समाज संपर्क व्यापक करा, मजेत जगा, इतरांच्या जगात डोकवा, सतत प्रगती करत राहा यांसारखी तत्त्वे या नव्या संस्कृतीची ओळख आहे. ही तत्त्वे आधुनिक जगण्याचाही एक भाग असलेली दिसतात. माणसाच्या सांस्कृतिक जडणघडणीतून आकारास येणारे हे जग आहे. नवी सामाजिक व्यवस्था अस्तित्वात आली की गरजेनुसार भाषिक व्यवहारासाठी नवी संकेतव्यवस्था निर्माण होत असते. यासाठी काही वेळा परंपरेतील काही भाषिक संकेत स्वीकारले जातात. आजच्या युगात ही संकेतव्यवस्था, माध्यम भाषेच्या रूपात अस्तित्वात आलेली आहे. ही भाषा दृश्य भाषा (Visual language) म्हणून ओळखली जाते. ध्वनीपेक्षा दृश्यातून अधिक बोलणे ही तिची ओळख आहे.

**माध्यम आणि समाजभाषा :**

वृत्तपत्राच्या स्वरूपानुसार भाषाभेदाचे स्वरूप पाहता येईल. बातम्यांच्या स्वरूपानुसार वृत्तपत्रातील लेखनशैलीची भाषा बदलत असते. बातम्यांचे मथळे पाहिले तर त्यामधील भाषा वापराचे स्वरूप लक्षात येईल. यासाठी उदाहरणादाखल काही मथळे पाहता येतील. 'शिळ्या कढीला ऊत', 'कंटेनर दरीत कोसळून एक ठार, चार जखमी', 'गर्दी... गर्दी... तुडुंब गर्दी', 'महाराष्ट्राच्या राजकारणाला 'आदर्श'ने ठरलेले वर्ष', 'भ्रष्टाचार सर्वच सरकारच्या काळात होता : अमर्त्य सेन', 'दहशतवादी रियाझ भटकळची पाकमध्ये



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

'गेम'', 'तिवारींचा खेळ संपुष्टात', 'काँग्रेस-राष्ट्रवादीत कलगीतुरा', 'प्रतिटन खनिजात तव्वल ३० ग्रॅम सोने!', 'बचत गटांच्या नावे कर्जाची 'उचल'', 'पंतप्रतिनिधींचा वाडा मोजतोय अखेरच्या घटका!', '.... तर सोने मिळण्यास भरपूर वाव', ''महागाई'वर 'ॲक्शन प्लॅन'', ''महा'महागाईची नांदी', 'महागाईचा आगडोंब', 'शाहीर 'ना' महाराष्ट्राचा प्राण!', 'कार्यकर्त्यांना 'ऊर्जा', लोकप्रतिनिधींना 'दम'' या मथळ्यांवरून मथळा लेखनात विरामचिन्हे, सर्वनामे, विधाने, उद्‌गार, विरोधार्थी शब्द, शब्दांचे ध्वन्यार्थ, म्हणी, वाक्प्रचार, प्रादेशिक बोलीतील शब्द यांचा वापर होतो हे लक्षात येते. त्यायोगे वर्तमानपत्रांना लोकांशी त्यांच्या बोलीतून सहज व सुलभ संवाद त्यांना आकर्षित करणे शक्य होते. मथळ्यांमध्ये द्वैभाषिकतेचा वापर व परिस्थितीनुरूप त्यांचे बदलणारे स्वरूप 'दहशतवादी रियाझ भटकळची पाकमध्ये 'गेम' आणि 'तिवारींचा खेळ संपुष्टात' या दोन बातम्यांवरून लक्षात घेता येते. (दै. पुढारी, कोल्हापूर आवृत्ती, बुधवार १२ जानेवारी २०११) या मथळ्यांमध्ये गेम आणि खेळ हे दोन शब्द भिन्न भाषांमधील समानार्थी शब्द आहेत. परंतु विशिष्ट सामाजिक परिस्थितीमध्ये 'गेम करणे' या वाक्प्रचाराचा अर्थ संपविणे अथवा ठार मारणे असा होतो. तर 'खेळ संपणे' या मराठीतील म्हणीचा अर्थ 'कार्य संपणे' अथवा 'मरणे' असा आहे. हे दोन शब्द समानार्थी असले, तरी त्यांचे सामाजिक व सांस्कृतिक संदर्भ भिन्न आहेत. विशिष्ट परिस्थितीमध्येही त्यांचे अर्थ बदलतात हे या बातम्यांच्या स्वरूपावरून लक्षात येते. 'समाज बदलानुसार होणारे भाषाबदल व संरचनात्मक बदल शोधायला वृत्तपत्राची भाषा एक महत्त्वाचे साधन होते आहे.'[२] याबरोबरच स्थानिक पातळीवरील बातमीचे स्वरूपही पाहता येईल. माहिती देण्याच्या हेतूने दिलेल्या बातम्या या साचेबंद असतात. तिची भाषिक मांडणी ठरीव असते. 'विश्वसंचार' या सदरामध्ये लोकांना आकृष्ट करून घेण्यासाठी 'रडणेही असते आरोग्यदायक!', 'काच होणार स्टीलपेक्षाही मजबूत' यांसारख्या मथळ्याखाली बातम्या दिल्या जातात. वैचित्र्य व आश्चर्य निर्माण करून लोकांना आकृष्ट करून घेणे हा या बातम्यांचा साचा तिच्या स्वरूपावरून ठरून गेलेला आहे. त्यातील बातम्यांची विश्वसनीयता हा वेगळाच मुद्दा आहे. वर्तमानपत्रातील जाहीरनिवेदनाची भाषा ही अधिक प्रमाणित असते. कारण तो सरकारी कामकाजाचा भाग असतो. वर्तमानपत्रातील लेख वर्णनात्मक माहितीवजा असतात. त्यातील भाषा ही सुबोध असते. एकूणच वृत्तपत्रीय भाषा झटपट व्यवहार करणाऱ्या व्यवहारी भाषेला, वर्तमानकालीन भाषेला आणि त्याचबरोबर प्रमाणित भाषेला जवळ करणारी असते. त्यामुळे ती मूळच्या भाषेतही बदल घडवणारी असते.

वर्तमानपत्रामधून जाहिरातदारांना लेखी स्वरूपात सर्व स्तरातील ग्राहकाशी संवाद साधायचा असतो. 'गतवर्षाची आठवण.. स्फूर्तीदायी नववर्षाचे आगमन स्फूर्तीदायी प्रत्येक क्षण, आनंददायी, स्फूर्तीदायी' ही दुग्धपदार्थ उत्पादक **'स्फूर्ती'**ची जाहिरात, 'ते जगातील सर्वांत गुंतागुंतीचं रेल्वेचं जाळं चालवतात, आम्ही त्यांचा कारभार सुरळीत राहण्यासाठी मदत करतो' ही **भारतीय स्टेट बँकेची** जाहिरात, 'लाईफ इज ए गेम प्ले' ही टी सिरिजच्या **प्ले मोबाईलची** जाहिरात, 'लागता चाहूल थंडीची, काळजी घ्या कोमल त्वचेची..' ही **अमृत मलमची** जाहिरात यातील भाषिक घटकाची निवड आपला ग्राहक वर्ग लक्षात घेऊन केलेली आहे. वर्तमानपत्रातील जाहिरातींचा विशेष म्हणजे शब्दांच्या दृश्यात्मकतेमधूनही परिणाम साधला जातो.

स्थानिक व प्रादेशिक पातळीवरील वर्तमानपत्रातील भाषेचे स्वरूप पाहिले तर पारंपरिक शब्दांचा बदलत्या सामाजिक परिस्थितीनुसार वापर होताना दिसतो. उदा. भन्नाट, खल्लास इ. परंतु समकालीन व्यवस्थेमध्ये नव्याने भाषा शिकणाऱ्यासाठी परंपरागत शब्दांचा





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अर्थ सांगण्याची सोय अथवा व्यवस्था नसेल तर मूळचा शब्दांचा अर्थ गहाळ होण्याची शक्यता असते. विषयाबद्दल मातृभाषेत, माहिती, साहित्य यांचा अभाव असेल तर भाषामिश्रण मोठ्या प्रमाणात होते. पर्यायाने त्यासाठीचे परभाषेतील शब्द व संज्ञा रूढ होतात. एका अर्थी माध्यमे वर्तमान बोलीतील शब्दांचा प्रचारही करत असतात. त्यामुळे बोलीतील परंपरागत शब्दांना फाटा मिळण्याची शक्यता असते. नव्या सामाजिक व्यवस्थेमध्ये गॅस, लिफ्ट, हॉल, बँड, बॅग, कोर्स, क्वालिटी, एच.आय.व्ही., गॅस्ट्रो यांसारखे शब्द रूढ झालेले आहेत. हे शब्द नव्या सामाजिक व्यवस्थेबरोबरच आल्याने या शब्दांना पर्यायी मराठी शब्द शोधणे आणि रूढ करणे जिकीरीचे आहे. त्याचबरोबर प्रत्येक क्षेत्राप्रमाणे काही शब्द स्वीकारले गेले आहेत. उदाहरणादाखल पाहावयाचे झाले तर अर्थव्यवस्थेमधील बँकिंग, अकाउंटंट, क्रेडिट, डेबिट, मार्केटिंग, प्लॅन, शेअर, सॅलरी इ.; शिक्षणक्षेत्र-आर्ट्स, कॉमर्स, सायन्स, इंजिनिअरिंग, स्टुडंट, ट्रेनिंग, प्रायव्हेट, टेस्ट इ.; मनोरंजन – हिरॉइन, हिरो, ग्लॅमर, रॉक, म्युझिक, डे, प्रपोज, अनलिमिटेड, टेलिव्हिजन, नॉनस्टॉप इ.; राजकारण- फायली, कमिटी, स्टॅम्प, नोटीस इ. यांसारखी काही उदाहरणे देता येतील. या संस्था आपला व्यवहारही याच शब्दांच्या आधारे करतात. त्यामुळे ते समाजमनावर ठसून व्यवहारात रुळून जातात. माध्यमांमधून रॅकेट, रॅली, लँडिंग, लँडलाईन, फ्लॅट, टिप्स, ट्रॅफिक, सिस्टिम, स्टार, शो, कार्टुन, फ्लॉप, लोकल, हीट, क्रीम, बिझनेस, सर्व्हिस, चार्जेस, ज्वेलर्स, मास्टर, हॅटट्रिक, डायल, कमर्शिअल, लक्झ्युरिअस यांसारखे शब्द सामाजिक व्यवस्थेमध्ये रुळून गेले आहेत. यातील काही शब्दांना पर्यायी मराठी शब्द सापडणे कठीण आहे. स्टडी सर्कल, रिॲलिटी शो, लकी ड्रॉ, शॉपिंग सेंटर, मॉल यांसारखे शब्दप्रयोग हे त्यासाठीचे आणखी एक उत्तम उदाहरण आहे. विद्युत उपकरणांच्या आणि उपग्रहांच्या युगात माध्यम चोवीस तास ग्राहकाला आकर्षित करून घेण्याचा प्रयत्न करीत आहेत. अशा काळात रोजच्या बोलीत या शब्दांचा, संज्ञांचा सहज प्रवेश होणे शक्य आहे, तितकेच त्यांना फाटा देऊन पर्यायी मराठी शब्द रूढ करणे अशक्य आहे. तत्काळ उपलब्धता या कारणाने अशा प्रकारचे शब्द संकल्पनांसकट आयात झाल्याने किंवा शब्दांचा अर्थविस्तार झाल्याने भाषामिश्रण आणि भाषिक बदल आपोआप घडतात. जागतिकीकरणाच्या आणि औद्योगीकरणाच्या काळात जग अनेक कारणांनी जवळ येत असताना नव्या भाषिक घटकांचा व भाषिक प्रयोगांचा स्वीकार करणे ही काळाची गरज आहे. दैनंदिन व्यवहारात दोन भाषा बरोबरीने वापरल्या गेल्याने भाषा मिश्रण होणे स्वाभाविकच असते. त्यामुळे आपल्या शब्द भांडारामध्ये भरच पडते; परंतु जेव्हा वृत्तपत्रामधून पोलिस बँड वाद्यवृंदासह संचलन झाले किंवा मॅनेजर-व्यवस्थापक, सभागृह-हॉल, कंत्राट-ठेका, प्रकल्प-प्रोजेक्ट, फायनल-अंतिम फेरी यांसारखे समानार्थी शब्द एकाच बातमीमध्ये वापरले जातात तेव्हा भाषिक संस्कार करण्यास माध्यम असमर्थ असल्याचे लक्षात येते. अशा वेळी माध्यमांनी आपल्या भाषिक संचिताबद्दल पर्यायाने आपल्या सांस्कृतिक संचिताबद्दल जाणीव जागृती दाखविणे गरजेचे आहे.

मुद्रित लेखनाबरोबरच श्राव्य व दृक्श्राव्य माध्यमे समाजमनावर प्रामुख्याने प्रभाव टाकत असतात. मुद्रित लेखनापेक्षा प्रभावी प्रसारमाध्यमे म्हणूनच त्यांचा उगम झाला आहे. श्राव्य प्रसारमाध्यम म्हणून सध्या आकाशवाणी, रेडिओ मिर्ची, टोमॅटो एफ एम, विविध भारती यांसारख्या वाहिन्या आहेत. प्रभावी निवेदनाच्या आधारे प्रेक्षकांशी संवाद साधणे हा श्राव्य माध्यमामधील महत्त्वाचा घटक आहे. प्रेक्षक वर्गानुसार निवेदनाची भाषा बदलते. ज्या वेळी सर्वसामान्य जनतेशी संवाद साधायचा असतो तेव्हा कार्यक्रमाची सुरुवात 'नमस्कार मंडळी!' अशी होते.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जेव्हा युवा मित्र-मैत्रिणींशी संवाद साधायचा असतो तेव्हा 'हॅलो मित्र-मैत्रिणींनो!' 'हाय! धीस इज ...' आणि जेव्हा खास स्त्रियांसाठीचा कार्यक्रम असतो तेव्हा 'नमस्कार मैत्रिणींनो' अशी सुरुवात केली जाते. समाजभाषा वैज्ञानिक पद्धतीने भाषेचा अभ्यास करताना बोलीतील उच्चारणाचाही अभ्यास केला जातो. आकाशवाणीसारख्या माध्यमातून संवादिकेच्या बोलण्याची लकब ऐकली तरी लक्षात येते, की हे आकाशवाणीचे कोणते केंद्र आहे. माध्यमे केवळ उच्चारणपद्धतीच्या आधारे आपली ओळख निर्माण करण्यात यशस्वी ठरतात. काळानुसार बदलत्या निवेदन पद्धतीमध्ये कूल, हॉट, ऑसम, रॉक यांसारखे शब्द युवापिढीशी संवाद साधताना निवेदकाकडून सर्रास वापरले जातात. माध्यमांचा पगडा असणाऱ्या व नव्याची ओढ असणाऱ्या नव्या पिढीतील युवावर्गाकडून ती बोलीत सहज स्वीकारली जातात; परंतु निवेदक जेव्हा स्थानिक पातळीवरील जनतेशी संवाद साधतो तेव्हा ग्रामीण बोलीतील शब्दांच्या उच्चारणामध्ये त्यांच्या चुका होताना दिसतात. काही वेळा त्यांच्या उच्चारणामुळे त्या शब्दांना नवाच अर्थ प्राप्त होतो. या वाहिन्यांवरून होणारे निवेदन एकाचवेळी इंग्रजी, मराठी, हिंदी, गुजराती, उर्दू अशा अनेक भाषांतून होते. यास्वरूपाचे भाषामिश्रण भाषिक निवडीच्या समृद्ध उपलब्धतेमुळे आणि मुक्त संचाराच्या सवयीमुळे किंवा शक्यतेमुळे होत असते. श्रोत्यांशी संवाद साधण्यासाठी ते आवश्यक असते. त्यातून भाषा भेसळीचा प्रश्न उपस्थित होतो आणि माध्यमांच्या प्रभावामुळे तो बोलीतही टिकून राहतो. 'द्वैभाषिकतेमध्ये दोन भाषांचे आणि संबंधित संस्कृतींचे योग्य नियमन नसल्याने गोंधळाची स्थिती आढळून येते. तसेच स्वत:च्या अस्मितेबाबतचा गोंधळ आढळून येतो.'[३] अशा वेळी वाहिन्यांनी भाषिक जाण ठेवणे व जोपासणे गरजेचे असते. भाषिक जाण असलेले निवेदक असणे हे श्राव्य माध्यमासाठी गरजेचे आहे. जागतिकीकरणाच्या आणि माध्यमांच्या युगात जग जवळ येत असताना कोणतीच एक भाषा व्यवस्थित शिस्तीने वापरली जाताना दिसत नाही. अनेक वाहिन्यांवरून ऐकवली जाणारी 'ये गाना है फ्रॉम द म्युझिक ......', 'इट्स हॉट', 'एकदम फ्रेश' यांसारखी विधाने या वाहिन्यांची ओळख आहे. इतकेच नव्हे तर मराठी-हिंदी-इंग्रजी या भाषांचे संमिश्रण करून बोलणे ही नव्या सुशिक्षित आणि आर्थिक स्तर उंचावलेल्या वर्गाची फॅशन बनली आहे. ती माध्यम भाषेच्या रूपाने जोपासली जाते, ती सर्वसामान्यांपर्यंत पोहोचवली जाते आणि लोकप्रियही केली जाते. बदलत्या सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, राजकीय वातावरणामध्ये जगत असताना पारंपरिक भाषिक संकेतांचा आग्रह धरणे चुकीचेच ठरेल. परंतु हा आग्रह नसून भाषेची उपयुक्तता त्या भाषेची मुळं टिकवून ठेवत असते, हा नियम लक्षात ठेवावयास हवा. आपले भाषिक संचित म्हणून तरी अनावश्यक ठिकाणी दुसऱ्या भाषेची हौस टाळावयास हवी.

वाहिन्यांवरून प्रसारित होणाऱ्या जाहिराती या देखील भाषिक अंगाने महत्त्वाच्या आहेत. ध्वनिमुद्रित जाहिराती या अधिक लयबद्ध व यमकांचा वापर केलेल्या असतात. घसा कूल बनवा (विक्स), भाई को भाई देख न पाया । देखे वो आके स्वाद की माया (गोवा पान मसाला), एक इच्छा पुरवा महाराज । तनिष्कचा हार आणा महाराज (तनिष्क ज्वेलर्स) यांसारख्या जाहिराती पाहता येतील. लयबद्ध जाहिरातींमधून ग्राहक वर्गाला आकर्षित करण्यासाठी भाषा भेसळ होताना दिसतात. यासाठी दृकश्राव्य वाहिन्यांवरील जाहिराती पाहता येतील. पर्क खा ग्लुकोज चढवा, प्रत्येक ड्रामाचा इंटरव्हल ॲक्टिव्ह पॉपकॉर्न, नव्या महाराष्ट्राच्या बदलत्या लाइफसाठी टाटा इंडिकॉम, दिल माँगे मोअर यांसारख्या जाहिराती पाहता येतील. मराठी आणि इंग्रजी या दोन भाषा एकमेकींत येथे मिसळलेल्या आहेत. या ओळींमधील लयबद्धता आणि आकर्षकता समाजमनावर प्रभाव टाकत



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असते. या ओळींची बालमनावर इतकी भुरळ पडते की मुले कवितेप्रमाणे या ओळी गुणगुणत असतात. लहान मुलांसाठीच्या जाहिरातीमध्ये यमी टमी यासारखे शब्द दैनंदिन व्यवहारात सहज वापरले जातात. त्यातील भाषेतून भाषा भेसळीचा प्रश्न तर उपस्थित राहतोच, पण त्याचा लहान मुलांवर होणारा परिणाम नव्याने भाषा शिकणाऱ्या मुलांसाठी निजभाषेचा प्रश्नही उपस्थित होतो. बालकांवर भाषिक संस्कार करणाऱ्या कुटुंब, त्याचा भवताल, शाळा या घटकांमध्ये प्रसारमाध्यमांची भूमिका महत्त्वाची आहे. त्या माध्यमामधून त्यांच्यावर होणारा भाषिक संस्कार अधिक प्रभावी असतो. हे सामाजिक भान प्रसारमाध्यमांनी ठेवणे गरजेचे आहे.

जाहिरात-संस्थांना बाजारात आपली ओळख बनवावी लागते. त्यासाठी या संस्था एखादी सूचक लयबद्ध ओळ तयार करत असतात. त्यामध्ये त्या उत्पादनाची वैशिष्ट्ये व उत्पादकाचा हेतू असतो. ज्यायोगे या संस्था ग्राहकाचा विश्वास संपादन करून योग्य भावात त्यांच्या गरजा पूर्ण करत असल्याचा दावा करतात. वस्तूच्या गुणवत्तेबद्दलची खात्री देत असतात. उदाहरणादाखल काही जाहिराती पाहता येतील. दो मिनट में हो तय्यार, दिल माँगे मोअर, ये फेविकॉल का मजबूत जोड है टूटेगा नहीं, दाग अच्छे है, खूब जमेगा रंग, जब मिल बैठेंगे तीन यार आप, मैं और बॅगपायपर, सनफिस्ट मारी – लाईट लाईट खाओ लाईट रहो, पुश करो खुश रहो, व्हॉट अॅन आयडिया सरजी, चमकत राहा, पहले इस्तेमाल करो फिर विश्वास करो, विक्स की गोली लो खिच खिच दूर करो, रिश्ता वही सोच नयी, डेल – द पॉवर टू डू मोअर, आय सी आय सी आय पुरे परिवार की पुरी सुरक्षा, एशिअन पेन्ट्स – पेन्ट युवर इमॅजिनेशन, इन्टेक्स थ्री जी – डिमांड मोअर, पारले जी – जी फॉर जीनीअस, एअरटेल – एक्सप्रेस युवरसेल्फ, गुड डे – हॅव अ गुड डे. फेविकॉलमधून नात्यांची मजबूती, दाग अच्छे है – मधून लहानग्यांचा निरागस प्रामाणिकपणा, पेप्सी आणि डेलमधून अधिकची अपेक्षा, मॅगीमधून समकालीन ज़गण्याला अपेक्षित चटपटीत झटपटीत अल्पोपहार, उगवत्या ताऱ्यांना रिनची चमक, सनफिस्टमधून नव्या लाइट युगाची ओळख. ही भाषा वर्तमान जीवन शैलीतून घडते आहे, समकालीन जगण्याशी समांतर आहे. त्या काहीशा तत्कालिक असतात. त्यामुळे त्या सतत बदलत असतात. या जाहिरातींमधील चटपटीतपणा आणि आकर्षकता यांचा प्रभाव ग्राहकास आपल्या जगण्याबद्दल उपहास आणि उपरोध व्यक्त करायला अवसर देत नाही. माध्यम भाषेची ही बाजूदेखील येथे भाषेद्वारे येणाऱ्या सामाजिक भानाच्या संदर्भात लक्षात घ्यावयास हवी.

चित्रमय जाहिरातींमध्ये कमी शब्दांत अधिक काही सांगण्याचा प्रयत्न केलेला असतो. उदाहरण म्हणून सध्या उपग्रह वाहिन्यांवरून प्रसारित होणारी सोसायटी टीची जाहिरात पाहता येईल. या जाहिरातीमधून सकाळच्या प्रसन्न आणि आरोग्यदायी वातावरणाची सुरुवात केवळ चित्रांतून दाखवून शेवटी 'सोसायटी टी – हर दिन नयी शुरुवात' एवढेच शब्द येतात. ही जाहिरातीची सूचक भाषा आहे. ही जाहिराताची दृश्य भाषा (Visual language) होय. तिची मांडणी ग्राहकाने जाहिरात पाहताच जाहिरात समजून घेण्याची क्षमता निर्माण करणारी असते. काही वेळा सजग ग्राहकासाठीची कलात्मकरीतीने बनवलेली विनाशब्दांची सूचक भाषेतील जाहिरात ही देखील भाषेपेक्षा अधिक काही बोलते. अशा जाहिरातींमधून सर्वमान्य अशा प्रतिमांचा आधार घेतलेला असतो. या जाहिराती समाजभाषा नव्या रूपात घडवताना दिसतात.

सध्याचे जग हे अनेक अर्थांनी लहान (micro) होत जाणारे आहे. अशा सामाजिक व सांस्कृतिक व्यवस्थेमध्ये भाषिक घटकदेखील संकुचित होत जाताना दिसतात. दैनंदिन व्यवहारात सकाळपासून रात्रीपर्यंत आपण किती शब्दांची संक्षिप्त रूपे वापरत असतो हा विचार केला तर हे लक्षात येईल. भ्रमणध्वनीवरून सतत मिळणाऱ्या जाहिरातींमधून ध्वनी आणि संख्या





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

यांचे संमिश्रण झालेले शब्द (?) पाहावयास मिळतात. हे संदेश अथवा एस.एम.एस. समजून घेण्यासाठी ती भाषिक क्षमताही आत्मसात करून घ्यावी लागते. हे नव्या सामाजिक व सांस्कृतिक व्यवस्थेमधून निर्माण झालेले भाषेचे नवे रूप आहे. भाषा ही संपर्कासाठी अस्तित्वात आलेली एक संकेतव्यवस्था आहे. माध्यमांची ही नवी भाषा नव्या युगाची संकेत व्यवस्था आहे. नव्या समाजाची नवी भाषा आहे. बदलत्या जीवनपद्धतीमध्ये ते सोयीचे निश्चितच आहे; परंतु त्यांच्या सततच्या प्रभावामुळे मूळची भाषिक रूपे हरवली जाऊ नयेत ही जबाबदारी घ्यावयास हवी. मराठी भाषेने आजवर अनेक आक्रमणे पचवली आहेत. त्यातून मराठी काही अंशी समृद्ध झाली; परंतु आपल्या भाषेत शब्द समृद्धता असूनही सोय, उच्चारणातील सुलभता अथवा दुसऱ्या भाषेचा सततचा प्रभाव यामुळे दुसऱ्या भाषेतील काही शब्द येतात ते टाळणे मात्र आवश्यक आहे. ही बाब खेड्यातही घडताना दिसते तेव्हा ती अधिक विचार करायला लावणारी गोष्ट आहे असे वाटते. कारण जागतिकीकरण आणि उदारीकरणाच्या रेट्यात जवळ जवळ सर्वच भाषा इंग्रजाळण्याची शक्यता दिसते आहे. उदाहरणच घ्यायचे झाले तर 'अन्न शिजवणे' या कृतीसाठी 'कुक' हा एकच आपल्या माहितीतला इंग्रजी शब्द वापरतो. परंतु मराठीमध्ये यासाठी 'परतविणे', 'उकडणे', 'भाजणे', 'तळणे', 'वाफाळणे', 'आच देणे', 'शेकणे', 'गरम करणे', 'उकळणे', 'तापविणे', 'वाफवणे' इ. शब्द उपलब्ध आहेत. आपल्या भौगोलिक-सांस्कृतिक परिसराची ती भाषिक देण आपणास आहे. लीला गोविलकरांनी हा संदर्भ देऊन म्हटले आहे की 'एखाद्या विभागामध्ये त्यामधील बारकावा व्यक्त करणारे शब्द जेव्हा तयार होत असतात, तेव्हा समजात त्या क्षेत्राला किती महत्त्व आहे हे त्यावरून स्पष्ट होत असते.'[४] जेव्हा एखादा शब्द बोलीतून जातो तेव्हा त्याबरोबरची सामाजिक, सांस्कृतिक व्यवस्था आणि पारंपरिक संचितही हरवत असते.

नव्या जीवनपद्धतीमध्ये उच्चारणामध्येही शब्दांचे संक्षेप सहज होऊ लागले आहेत, हेही लक्षात घ्यावयास हवे. भाषिक संकेत वापरातील तार्किकता या भाषिक बदलाला वळ देते आहे. माध्यमांच्या भाषा निर्मितीमध्ये एकप्रकारचे अर्थकारण, समाजकारण, राजकारण गुंतलेले आहे. तिच्या निर्मितीमध्ये विशिष्ट सांस्कृतिक व्यवस्था दडलेली आहे. यासारख्या अनेक कारणांनी ती स्वयंपूर्ण आहे. आपल्या जगण्याकडूनच अधिकच्या अपेक्षा आणि मजेचे आणि सुखाचे जीवन जगण्याचा कल माध्यमांमधील भाषेमधून प्रतिबिंबित होताना दिसतो. भाषिक बदल ही एक नैसर्गिक प्रक्रिया आहे. या भाषिक व्यवस्थेमध्ये जितक्या झपाट्याने भर पडत आहे तितक्याच झपाट्याने विशिष्ट प्रदेशातील भाषिक घटकांचे पारंपरिक संदर्भ नजरेआड होताना दिसताहेत. काही स्थानिक वाहिन्यांवरून हे संदर्भ जपण्याचा प्रयत्न केला जाताना दिसतो. परंतु त्या वाहिन्यांवरील अशा शब्दांचे उच्चारण आणि लावलेला अर्थ काही वेळा संदर्भहीन असतो. मुळच्या अर्थाला धक्का लावणारा असतो. माध्यमांनी योग्य भाषिक जाण ठेवणे आवश्यक आहे हे यातून स्पष्ट होते.

**संदर्भ ग्रंथ :**


१. Raman Meenakshi & Sharma Sangeeta, Technical communication, principles and practice, Oxford university press, 2nd. Ad., 2004. page 5
२. डॉ. जयश्री पाटणकर, (संपा.) सामाजिक भाषाविज्ञान : कक्षा आणि अभ्यास, वृत्तपत्रीय भाषेचे समाजभाषा वैज्ञानिक आकलन, डॉ. विनीता परांजपे, ससंदर्भ प्रकाशन, नाशिक, प्रथमावृत्ती, २००५, पृष्ठ १४०.
३. तत्रैव, भाषिक बदल : कारणे आणि स्वरूप, डॉ. माधवी आपटे, डॉ. जयश्री पाटणकर, पृ. ९४.
४. तत्रैव, भाषिक समाज आणि संज्ञापन, डॉ. लीला गोविलकर, पृ. ७१.


◇◇◇


**सुप्रिया सुभाष आवारे**
aadibandh@yahoo.co.in
(भ्रमणभाष : ८९७५८६८०७९)





अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# लोकभाषेचा कलाविष्कार : भक्तिरचना

– डॉ. सतीश बडवे

*[संतांनी लोकभाषेला ज्ञानभाषेचा दर्जा दिला; एवढेच नव्हे तर ज्ञान सर्वतोमुखी करण्यासाठी त्याला गायनकलेची आणि नाट्यमयतेची जोड देऊन लोककलेचा आविष्कार घडविला. चक्रीभजन, सोंगीभजन, रिंगणभजन, सूफी भजने, मतमाउलीची भजने, कथा-पुराण, पोथीवाचन, गोंधळ, रूपक, दिंडी-वारी, कीर्तन, आरती, लळित, कृष्णलीला इ. प्रकारांनी हा मौखिक कलाविष्कार समाजधारणेसाठी कसा विकसित झाला त्याचा परामर्श या लेखात घेतला आहे.*

*–संपादक]*

लोकसमूह आणि लोकसंस्कृतीची ऊर्जा मराठी साहित्यामध्ये संतकाव्याने मोठ्या प्रमाणावर व्यक्त केली असे म्हणता येते. संतपरंपरा ही सामान्य लोकांमधून उदयास आलेली आढळते. सर्वसामान्य लोकांचे प्रतिनिधी म्हणून संतांचा उल्लेख करता येतो. सामान्यांचे प्रबोधन करण्यासाठी त्यांनी लोकमाध्यमांचा वापर केला. हा वापर करताना लोककलावंताची भूमिका जशी असते तशीच संतांनीही स्वीकारल्याचे आढळते. लोकसमूहाला आपण जे सांगणार आहोत ते लोकसमूहाने आत्मीयतेने स्वीकारायला हवे; यासाठी त्यांना काय ऐकावेसे वाटते, काय ऐकल्याने त्यांचे कदाचित रंजनही होईल आणि आपले म्हणणेही त्यांच्यापर्यंत पोचवता येईल यासाठी कलावंत जसे जिवाचे रान करतो तशीच भूमिका संतांनीही स्वीकारली होती. प्रबोधन करण्यासाठी आवश्यक असणारी ही बाब संतांच्या व्यक्तिमत्त्वात पुरेपूर मुरली होती हे ध्यानात येते. 'ऐसी कळवळ्याचीं जाती । करी लाभाविण प्रीती' हे तुकोबांचे उद्‌गार त्याची साक्ष आहेत. लोकोद्धाराची संतांची भूमिका लोकांविषयीच्या कळवळ्यातून आणि जिव्हाळ्यातून उदित झालेली दिसते. 'बुडती हे जन देखवेता डोळा' यातील सामान्य लोकांच्या बुडण्याच्या स्थितीत बदल करण्यासाठी लोकश्रद्धांचा विचार संतांनी भिन्न भिन्न पातळ्यांवरून केलेला दिसतो.

लोकभाषेचा स्वीकार किंवा लोकभाषेलाच ज्ञानभाषेचा दर्जा देण्याचे संतांचे कार्य मोलाचे आहे. विदग्ध संस्कृतातील सत्त्वसंपन्न गोष्टींचा स्वीकार संतांनी केला होता हे खरे असले तरी बहुजनांच्या भाषेचा त्यांनी केलेला स्वीकार लक्षणीय ठरणारा आहे. ओवी-अभंग यासारखे देशी छंद त्यांनी स्वीकारले. त्यांच्या रचनांनाही लोकगीतांची लय आहे. लोकसाहित्याचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. रा. चिं. ढेरे यांनी यासंदर्भात मांडलेले मत महत्त्वाचे वाटते. त्यांच्या मते, "संतांनी लोकगीतसरणी उचलली. भारूडांची अद्‌भुत सृष्टी उभी केली. लावण्या-पोवाड्यांचीही रचना केली. लोकविश्वासांची, लोकश्रद्धांची आणि त्या श्रद्धांशी निगडित असलेल्या दैवतांची त्यांनी अनेक प्रसंगी निर्भत्सना केली, हे खरे आहे; परंतु लोकजीवन भ्रष्ट, अधोगत करणाऱ्या या कालबाह्य श्रद्धांचा चिवटपणा ध्यानी घेऊन, त्या त्या श्रद्धांचे त्यांनी उन्नयन केले. त्या श्रद्धांच्या मूर्त रूपांचे – लोकदैवतांचेही उन्नयन केले. संतांनी आपल्यापरीने लोकश्रद्धांचे, लोकदैवतांचे उन्नयन करीत असताना लोकश्रद्धांना नवे रूप देण्यासाठी, त्या श्रद्धांचे कालबाह्य क्षुद्रत्व फेडून त्यात नवा उदात्त आशय भरण्यासाठी आपल्या 'करुणे'चे जे 'बहुरूपी' दर्शन घडविले आहे, ते अक्षरश: अद्‌भुत आहे." (लोकसाहित्य शोध आणि समीक्षा पृ. ५०-५१)

संत हे लोकसंवादी होते याचे कितीतरी दाखले देता येतील. ज्ञानेश्वरी हा लोकसंवाद आहे. समूहासमोर





मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

त्याचे 'कथन' झाले आहे. या अर्थाने हा मौखिक आविष्कारच आहे. वस्तुतः मौखिकता ही आविष्कारपद्धती आहे. लेखन, मुद्रण आणि सध्याचे इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञान – अशा समर्थ माध्यमांना तोंड देत ही आविष्कारपद्धती आजही टिकून आहे. मौखिकता ही आपली परंपरा आहे. 'लोकपरंपरा नसलेलं कोणतच साहित्य राष्ट्रीय होऊ शकत नाही' हे डॉ. नेमाडे यांचे विधानही इथे ध्यानात घ्यावयास हवे. (मौखिकता आणि लोकसाहित्य, पृ. १) संतांनीही लोकपरंपरेचा स्वीकार केला होता. परंपरेतील व्यक्तिविशिष्ट अशा कामाविष्काराला पूरक ठरणाऱ्या रचना संतांनी केलेल्या आहेत. मौखिक ओवीची ही परंपरा डॉ. प्रभाकर मांडे यांनी त्यांच्या अलीकडच्या ग्रंथात (मौखिक वाङ्‌मयाची परंपरा स्वरूप आणि भवितव्य) विस्ताराने वर्णिलेली आहे.

*'धरासंसाराला जीव माझा कदरला*
*आता न्या विठ्ठला मज माहेरला'*

असे स्त्रीगीतांमधून प्रकटणारे पंढरपुराचे आकर्षण आणि संसारात शिणलेल्या स्त्रियांना पंढरपुरात मिळणारा मायेचा ओलावा ओवीगीतातून आविष्कृत होतो. तीच भावना नामदेवांच्या रचनेतही बघता येते –

*'विठ्ठल माऊली, कृपेची सावली*
*आठविता घाली प्रेमपान्हा'*

परिसरानुसार ओवीगीतांचे आविष्कार बदलत जातात. जसे की पैठणच्या परिसरातील ओवीत नाथांविषयीचा प्रेमभाव, ज्योतिर्लिंगांच्या परिसरातील ओवीत त्याविषयीचा श्रद्धाभाव प्रकटतो. सामाजिक विषमता, उच्चनीच भाव व श्रेष्ठ-कनिष्ठता असे सर्व अभिमान दूर करण्यासाठी विचार देणारी संतांची अभंगरचनाही तेवढीच महत्त्वाची ठरावी. उदा. –

*उभारोनी बाह्या । सकळा आश्वासन*
*या रे अठरा वर्ण पंढरीसी ।। (संत एकनाथ)*
किंवा
*वर्ण अभिमान । विसरली याती*
*एकएका लोटांगणी । जाणी रे ।। (संत तुकाराम)*

ओवीअभंगांचा हा आविष्कार व्यक्तिविशिष्ट आविष्कार आहे. हेही इथे लक्षात येते. ओवी ही लोकसंस्कृतीतील अधिष्टाची आहे व संतांनी तिलाच प्रतिष्ठा मिळवून दिली.

मौखिक संस्कृती ही काव्यरचनेला जवळची आहे. कष्टकरी व ग्रामीण वर्गाशी नाते सांगणारी आहे. जो दबलेला, शोषित असलेला जनसमूह आहे त्याचे हे सुरक्षित साधन आहे. म्हणून संतांनी आविष्काराचे प्रमुख साधन म्हणून मौखिक शैली विकसित केली.

संतांच्या मौखिक शैलीसाठी त्यांनी पारंपरिक लोककलांचाच उपयोग केलेला दिसतो. त्याचे स्वरूप ध्यानात घेण्यासारखे आहे.

**धार्मिक प्रकार–** पुराण, प्रवचन, पारायण, पाठ
**लोकप्रिय वाङ्‌मय प्रकार–** ओवी, अभंग, पद, भूपाळी, पाळणे, गण, गौळण, विराणी, श्लोक, कृष्णलीला, पद्यचरित्र
**नाट्यात्मक व संगीतात्मक प्रकार–** गोंधळ, रूपक, भेदिक, जागरण, ललित, आरत्या (वेगवेगळ्या वेळच्या), श्लोक, भारूड
**वैयक्तिक प्रकार–** मंत्र, नामस्मरण आणि हरिपाठ
**समूहासाठी–** कथा, पोथी, सप्ताह, काला, पालखी, दिंडी, वारी, भजन
**संस्थात्मक प्रकार–** कीर्तन (सर्वांत महत्त्वाचा)

ग्रामीण लोकांच्या कुवतीला परवडणारी ही मौखिक शैली आहे. श्रोत्यांचे मनोरंजन आणि उद्बोधन हे दोन महत्त्वाचे हेतू त्यापाठीमागे आहेत. चोखोबांनी शोषित वर्गाची आविष्कारशैली प्रथम आणली.

** बहुत हिंडलो देशदेशांतर । परि मन नाही झाले स्थिर कोठे*

** बहुत तीर्थे फिरोनिया आलो । मनासवे झालो वेडगळची*

यातील फक्त एका मौखिक कला-आविष्काराचा स्थूल परिचय इथे करून देण्याचा प्रयत्न आहे. तो कलाविष्कार म्हणजे 'भजन' होय. ईश्वराची भावभक्ती,



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

अनुक्रमणिका

नामस्मरण आणि रूपवर्णन याला भजनात विशेष स्थान असते. या सर्व गोष्टी साध्य करण्यासाठीच संतांनी पठणसुकर रचना केल्या. या रचना गाणे म्हणजे भजन करणे होय. हा एकाग्रतेसाठी समूहाने करावयाचा आविष्कार असतो.

भजन एकावेळी एकजण किंवा अनेकजण म्हणतो/म्हणतात. शब्द, सूर आणि ताल यांच्या एकत्रित परिणामातून परमेश्वराशी एकरूप होण्याची भावना व्यक्त करणारा हा गेय मौखिक आविष्कार आहे. टाळ, मृदंग, चिपळ्या, पखवाज, संवादिनी या वाद्यांचा वापर करून ही सांगितिक पद्धतीने केली जाणारी क्रिया मानता येते.

संत नामदेवांनी भजन परंपरेचा प्रारंभ केला. ते कीर्तनपरंपरेचे उद्‌गाते म्हणून ओळखले जातात. वारकऱ्यांचे लोकसंघटन करण्यासाठी नामदेवांनी ही लोकमाध्यमे वापरली असे म्हणता येते. भजन करण्याची एक विशिष्ट रीत असते. भजनाच्या पूर्वरंगात प्रारंभी 'जय जय राम कृष्ण हरी' असे नामस्मरण केले जाते. त्यानंतर मंगलाचरणाचा अभंग गायिला जातो. 'सुंदर ते ध्यान उभे विटेवरी' (तुकोबा), 'रूप पाहता लोचनी' (ज्ञानोबा). यानंतर अन्य संतांचे अभंग गायले जातात. यालाच भजनाचा पूर्वारंग असे संबोधले जाते. पूर्वरंगानंतर भजनाच्या अंतरंगाचा विचार करता येईल. त्यात नाथांची भारूडे, गौळणी म्हणण्याची पद्धत आहे. भजनाच्या अखेरीस आरती केली जाते व पसायदान म्हणून समाप्ती होते.

भजन गाणाऱ्या भक्तांच्या समूहाला 'फड' असे म्हणतात. वारकऱ्यांचे वेगवेगळे भजनी फड आहेत. भजन हे नामभक्तीचे साधन आहे. सांप्रदायिक भजनामध्ये या फडाच्या मध्यभागी विणेकरी उभा राहतो. तो सद्‌गुरूची दीक्षा घेतलेला असतो. वारकरी संप्रदायात चक्री भजन, सोंगी भजन, रिंगण भजन असेही भजनाच्या सादरीकरणाचे प्रकार आहेत.

- **चक्री भजन–** एखादा अभंग भजन म्हणून गायल्यानंतर त्याच्या शेवटच्या अक्षरापासून लगेचच दुसरा अभंग म्हणण्यास सुरुवात करतात. याला चक्री भजन असे नाव आहे.
- **सोंगी भजन–** या प्रकारात देवभक्ताच्या संवादाचा उपयोग सोंगे घेऊन करण्याची पद्धत आहे. म्हणून त्याला सोंगी भजन असे नाव दिलेले दिसते.
- **रिंगण भजन–** यात तीन वेगवेगळी भजन मंडळे गोलाकार उभी राहून एकापोठापाठ एक क्रमाने अभंग गातात व भजन करतात. त्यातून भजनाचेही रिंगण बनते. म्हणून हे रिंगण भजन या नावाने ओळखले जाते.

इथे गायन हा भजनाचा केंद्रवर्ती भाग असल्याचे ध्यानात येते. भजन करणे ही गेल्या काही शतकांची परंपरा आहे. म्हणून त्याकडे पारंपरिक कलात्मक लोकाविष्कार म्हणून बघता येईल.

विविध संप्रदायांमध्ये भजन म्हणण्याची पद्धत आहे; पण त्यांच्या सादरीकरणाची रीत भिन्न आहे. त्या सर्वांचा हेतू ईश्वराचे नामस्मरण करणे व त्याची भक्ती करणे हाच आहे. महानुभाव पंथात पूजेच्या वेळी कृष्णभक्तिपर गीतगायन केले जाते. ते कृष्ण रूपाचे स्तवन अथवा भजनच असते. समर्थ संप्रदायात रामनाम आणि रामस्तुतीची पदे गायिली जातात. उत्तरेत संतभक्तांच्या रचनाही भजनातून गाण्याची पद्धत आहे. नानकदेवं, कबीरदास, मीराबाई, नरोत्तमदास यांच्या पदरचना गायिल्या जातात. सिक्ख संप्रदायात 'गुरूग्रंथसाहिबा' या ग्रंथात समाविष्ट असणारी छत्तीस कवींची कवने गायिली जातात. उत्तरेतील भजन हे 'निर्गुणी भजन' म्हणून परिचित आहे. उत्तरेकडे मीराबाई व सूरदास यांची कवने सामुदायिक पद्धतीने गाण्याचीही रीत आहे. या भजन परंपरेत निर्गुणी भजन, गोरखनाथी, वल्लभपंथी, अष्टचाप, मधुराभक्तिपर रचना यांचाही समावेश केला जातो. कबीरपंथी भजने महाराष्ट्रात सर्वत्र प्रचलित नसली तरी दलित समाजातील बांधव आपापल्या परिसरात त्याचे गायन करतात. सूफी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

संप्रदायाचे अनुयायी खुदा वा रबची आळवणी 'कव्वाली' मधून करतात. सूफींमध्येही भक्तिपर रचना आढळतात. सूफी भक्तांची ही आळवणी भजनासारखीच असते.

दक्षिण प्रदेशातही भजनकीर्तनाची परंपरा असली तरी त्याचे स्वरूप निराळे आहे. कर्नाटकात माधव वैष्णव संप्रदायाचे पुरंदरदास यांच्या रचना गाण्याची प्रथा आहे. ही दासकूटांची शिष्यपरंपरा आहे. हेही संगीतमय भजनच असते. पुरंदरदासांनी तर संगीताचे पाठच तयार केले होते. दक्षिण प्रदेशातील तमिळनाडू प्रांतात शैव वैष्णवांच्या पदरचना प्रसिद्ध आहेत. त्याही गीतात्मक आणि संगीतानुकूल आहेत. त्यातील शैवांच्या पदरचना 'तेवराम' या ग्रंथात संग्रहित केलेल्या असून वैष्णवांच्या पदरचना 'नालायार दिव्यप्रबंधम्' मध्ये उपलब्ध होतात. संगीतबद्ध आणि रागदारीयुक्त पदांचे गायन करण्याची परंपरा येथे आहे. महाराष्ट्रातील कीर्तनाचा बाज दक्षिणेतील कीर्तनाला नाही. या पदरचना हरिकीर्तनात गायिल्या जातात. त्याला 'कथाकालक्षेपम्' अशी संज्ञा आहे. हरिकथेचे गायन करणे ही त्यातील मूळ भूमिका आहे. तेलुगू प्रदेशातील (आंध्र प्रदेश) भजन परंपराही लालासूराशीच निगडित आहे. अन्नम्माचार्य, त्यागराज यांची पदरचना गायनाचीही परंपरा 'दैवपरंपरा' या नावाने परिचित आहे. प्रामुख्याने बेंकटेशाचे स्तवन हा या पदरचनेचा हेतू दिसतो. रामदासपंचायतनातील केशवस्वामी भागानगरकर यांची काही मराठी पदरचना नव्याने प्रकाशात आली आहे. तीही रागदारीशी संबंधित आहे. एकूणच दक्षिणेतील भजन परंपरा रागदारी संगीताच्या साथीने आविष्कृत होणारी आहे. या सर्व पदचरणांमध्ये आराध्य दैवताचे गुणगान करणारी रचना सादर केली जाते. मूळ हेतू ईश्वरभक्तीचा असला तरी सादरीकरणाच्या अंगाने विचार केला तर तो कलाविष्कार आहे.

कालमानानुसार या लोकाविष्कारात काही बदल झाले, काही नव्या गोष्टी आल्या. महाराष्ट्रापुरता विचार केला तर आजही गावोगावी सांप्रदायिक भजनी मंडळे कार्यरत आहेत. स्त्रियांची खास अशी भजनी मंडळे तयार झालेली दिसतात. गणेशोत्सव वा अन्य सणांच्या निमित्ताने या भजनांच्या स्पर्धाही आयोजित केल्या जातात. दत्तसांप्रदायिक व देवीभक्तांची भजनी मंडळेही अस्तित्वात आहेत. उपास्य दैवतानुसार भजनातील आशय बदलतो; पण मूळ भक्तांचा उद्देश मात्र बदलत नाही. ख्रिस्ती समाजातही भजने म्हणण्याची पद्धत रूढ झाली आहे. मतमाउली किंवा मदरआईची जत्रा जेव्हा भरते त्या वेळी तिचे स्मरण करणारी, तिचे गुणगान गाणारी भजने म्हणण्याचा प्रघात आहे. सामाजिक वास्तव बदलल्यानंतर अनेक शहरांमधून ज्या सदनिका वा गृहनिर्माण सोसायट्या निर्माण झाल्या, तिथेही भजनी मंडळे अस्तित्वात आली. भजन स्पर्धांचे आयोजन हा एक वेगळाच उपक्रम सार्वजनिक कार्यक्रमात रूढ झालेला आहे. इतकेच नव्हे तर महानगरीय लोकलच्या प्रवासातही दीर्घ अंतर पार करणाऱ्या स्त्री-पुरुषांनी आपली भजन मंडळे तयार केलेली आढळतात. एकूण विचार करता भजन या पारंपरिक लोकाधिकाराची विविध रूपे कालमानाला अनुसरून प्रकट झालेली दिसतात.

अभंग, गीत, पद, कवन यांच्यामधून भजनाचा आविष्कार होताना दिसतो. भजनाची ही परंपरा प्रदीर्घ आहे. भजन हा लोकाविष्कार म्हणजे लोकांनी केलेली एक सामूहिक कृती असते. सध्याचा काळ हा संवाद तुटत चालल्याचा काळ आहे. अशा वेळी समूहभान जागवणारा एक वैशिष्ट्यपूर्ण लोकाविष्कार म्हणून 'भजन' या कलाविष्काराकडे बघता येईल. माणूसपण वृद्धिंगत करणारी भजनाची अभिव्यक्ती म्हणजे लोकऊर्जेचे एक ठळक उदाहरण ठरावे.

◇◇◇

**डॉ. सतीश बडवे**
मराठी भाषा व वाङ्मय विभाग
डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,
औरंगाबाद. चलभाष : ९१५८९९७७९७





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




अनुक्रमणिका

पुस्तक परिचय

# 'दूर कोई गाए... : स्वप्निल श्रीकांत पोरे

– मंगेश तेंडुलकर

माझ्या बालपणी पावसाळ्यात मी कागदाची होडी करून रस्त्याच्या कडेने वाहणाऱ्या पाण्यात सोडायचा. प्रवाहाच्या पुढे पळत जाऊन पाण्यातली होडी तिथपर्यंत कशी येते हे कुतूहलाने पाहत उभा राहायचा. असे करत पावसात भिजत दूरवर जायचा. शेवटी ती होडी कुणाच्या पावलाखाली, सायकलच्या चाकाखाली येऊन दबली की उड्या मारत परत यायचा. नंतरच्या काळात हेच कुतूहल आणखी एका वेगळ्या दिशेला गेले. श्रेष्ठ लोकोत्तर कर्तबगार, गुणी अशी प्रसिद्ध माणसे एकेकाळी कुणीही नव्हती त्या अवस्थेपासून ते लोकोत्तर अवस्थेपर्यंत कशी पोहोचली? या प्रश्नात माझे कुतूहल सामावले. नेमक्या याच कारणाने स्वप्निल पोरे यांचे 'दूर कोई गाए' हे पुस्तक हातात पडताच वाचायला सुरुवात केली. हे पुस्तक वाचत वाचत मी माझ्या घरापासून, माझ्यापासून किती दूरवर निघून गेलो कळलेच नाही. शेवटच्या पानावरची शेवटची ओळ आणि 'कैसे कोई जिये?' या अस्वस्थ करणाऱ्या गाण्याच्या आठवणीपाशी भानावर आलो. पुस्तक वाचून संपले होते. होडी बुडल्यानंतर पूर्वी पळत घरी येत असे. पुस्तक संपल्यावर मात्र माझ्यापर्यंत परत नेणारी वाट बराच काळ मला सापडत नव्हती. हा काही वेगळाच अनुभव मी घेत होतो. "कैसे कोई जिये?" आठवणीत गरगरत असताना शमशाद बेगमचे "धरती को आकाश पुकारे–" त्यातल्या बेसड्रमसकट घुमू लागले. पाठोपाठ "तोड दिया दिल मेरा" या तिन्ही खूप आवडत्या गाण्यांच्या एकत्रित कल्लोळात मी दीर्घकाळ हरवून गेलो. वाचन हे चित्रपट पाहण्यापेक्षा अधिक परिणामकारक होऊ शकते हेही अनुभवले.

स्वप्निल पोरे यांनी 'दूर कोई गाए' या पुस्तकात शमशाद बेगम, सुरैया आणि गीता दत्त या तीन श्रेष्ठ गायिकांवर लिहिलेल्या लेखांचा समावेश आहे. कलेच्या माध्यमातून माणसे कित्येकदा रक्ताच्या नात्यापेक्षा जवळ येतात. ही जवळीक श्रोत्यांना, चाहत्यांनाच फक्त जाणवावी आणि कलाकार मात्र त्यापासून अनभिज्ञ, अलिप्त राहावेत ही इथली काय विक्षिप्त योजना आहे कळायला मार्ग नाही; पण हे वास्तव आहे. अधून मधून कुणी श्रेष्ठ गायक-गायिका "मुझे मिला आप सबका प्यार!" वगैरे बोलतात, लिहितात. पण ती प्रेमाची फक्त ॲक्नॉलेजमेंट असते. पोचपावती असते. चाहता आणि कलाकार यांच्यातल्या नात्याची ऊब त्यात नसते. श्रोत्या-चाहत्यांच्या बाजूने हे सर्व विलक्षण, पण एकतर्फी प्रेमप्रकरणच असते. कुठल्याही कलाकाराच्या वाटचालीत यशाबरोबर आत्मविश्वास वाढीला लागतो. हा आत्मविश्वास वाढत वाढत कलाकाराला आत्मकेंद्री ब्लॅकहोलमध्ये केव्हा नेतो कुणालाच पत्ता लागत नाही. त्या अथांग काळोखात प्रकाशाच्या किरणापासून श्रोत्यांच्या प्रेमापर्यंत जे जवळ येईल ते सारे गडप होत राहते. त्याची फक्त पोचपावती मिळते. हे सगळे असेच. माणसांच्या नियंत्रणाबाहेरचे. कोणताही पूर्वग्रह न ठेवता कुतूहल म्हणून पाहायचे. 'दूर कोई गए' हे पुस्तक म्हणजे एका निःसीम चाहत्याची तीन 'प्रेमप्रकरणे' आहेत. "कमोदिनी काय जाणे तो परिमळ। भ्रमर सकळ भोगितसे। तैसे ठावे नाही तुझे नाम। आम्हीच ते प्रेमसुख जाणों।" अशी प्रेमप्रकरणे!

आपण कुणीही नाहीत पासून कुणीतरी आहोत



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पर्यंतची या तिन्ही श्रेष्ठ गायिकांची वाटचाल पाहिली आणि वाटले, की काही माणसे जन्माला येतात ती प्रयोजन घेऊनच येतात. आजूबाजूची आप्तस्वकीय माणसे, परिस्थिती, ताणतणाव, संधी, अडचणी, संकटे, आपत्ती या सगळ्याची प्रयोजनाला पूरक अशी टाइमबाऊंड आणखी कुठेतरी आधीच करून कार्यान्वित होत असावी. याचे प्रत्यंतर फक्त या तीन गायिकांच्याबाबतीतच नव्हे, तर श्रेष्ठ लोकोत्तर ठरलेल्या कुणाही व्यक्तीच्या वाटचालीत न चुकता हेच सर्व सापडते. 'जया अंगी मोठेपण तया यातना कठीण!' यातून आणखी वेगळे ते काय व्यक्त होते?

या पुस्तकातले तिन्ही लेख वाचताना या 'यातना' मजसारख्या सामान्य इसमाला विलक्षण अस्वस्थ करून गेल्या. यातला एखादा अंश माझ्या वाट्याला येता तरी मी क्षणार्धात नष्ट झालो असतो. (म्हणूनच माझे अस्तित्व सामान्य राहिले!) पतीच्या मृत्यूनंतर संसाराचा गाडा चालविण्यासाठी गीता दत्त गाण्याचे कार्यक्रम करत असे, असा उल्लेख या पुस्तकात आहे. अशा कार्यक्रमात "तुम जो मिल गए हो" सारख्या एखाद्या गाण्याला श्रोत्यांची आलेली उत्स्फूर्त दाद या गायिकेच्या अंत:करणात काय विदारक कोलाहल माजवून गेली असेल! तो सगळा आतल्या आत स्वीकारून श्रोत्यांमधून आलेला 'वन्स मोअर' तिने कुठल्या आधारावर गायिला असेल कळायला मार्ग नाही.

या तिन्ही गायिकांच्या संदर्भात लिहिताना लेखकाने अमृतातेंही पैजा जिंके ऐसी अक्षरे मिळविली आहेत. वृत्तपत्रात काम करत असताना हिंदी फिल्मसृष्टीतल्या अनेक थोरामोठ्यांच्या त्यांनी घेतलेल्या मुलाखती, बोलण्याची, गप्पा करण्याची त्यांना मिळालेली संधी हे सर्व या लेखनात सत्कारणी लागले. एखाद्या व्यक्तीशी प्रत्यक्ष बोलणे आणि टेलिफोनवर बोलणे यातला फरक इथे उपयोगाला आला आहे.

एखादे साधे पत्र लिहिणे आणि प्रेमात पडून पत्र लिहिणे, यातल्या भाषेत जे परिवर्तन घडते ते या पुस्तकात वाचायला मिळते. लेखक नुसता लेखक नाही. तो या तिघींच्या गाण्याच्या प्रेमात बुडून पार तळाशी पोहोचलेला आहे. अनेक ठिकाणी त्याला किती लिहू आणि काय नको असे झाले आहे. लिहिता लिहिता मोठ्या शिकस्तीने तो स्वत:ला आवरताना दिसतो. 'ये अपनी किस्मत है कोई जीते कोई हारे' हा संघर्ष तिन्ही ठिकाणी वेगवेगळ्या स्वरूपात आहे. भिंतीवरल्या एखाद्या फोटोफ्रेमच्या मागे पक्ष्यांनी घरटे करावे तशी अनेक कलाकार मंडळी आयुष्याच्या उत्तरार्धात स्वत:च्याच फोटोफ्रेमच्या मागे घरटे करून गुपचूप राहिलेली दिसतात. या पुस्तकातही हेच चित्र आहे. फ्लॅशलाईट चमकून गेल्यानंतरचा अंधार खायला उठतो तसे काहीसे होत असावे इथे!

कदाचित हे सुद्धा पूर्वनियोजित असावे. खायला उठणाऱ्या अंधारात डोळे सताड उघडून या कलाकारांनी पुन्हा उजेडाच्या दिशेने मार्गस्थ व्हावे असा हेतू यामागे असू शकेल. हे एकूणच सारे अस्तित्व असे अतर्क्य, अगम्य आहे.

माझ्यासारख्या सामान्य माणसाला या पुस्तकाने कुठे आणून सोडले, पाहिलेत?

**दूर कोई गाए**
स्वप्निल श्रीकांत पोरे (९४२२०२९०४१)
प्रतीक प्रकाशन, पुणे

◊◊◊

**मंगेश तेंडुलकर**
७ गिरिकुंज (ब) ७ वा रस्ता,
डहाणूकर कॉलनी,
पुणे ४११ ०२९

कार्यवृत्त पाठविताना अनेक पत्रांद्वारे न पाठविता संबंधित अंकाच्या प्रकाशन-महिन्याच्या तिसऱ्या महिन्याच्या १५ तारखेपर्यंत एकत्रित स्वरूपात पाठवावे.
– संपादक



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

चावडीवरच्या गप्पा

# एक राजकीय व्यंग्य : श्री. रजनीश जोशी

– गो. मा. पवार

श्री. रजनीश जोशी हे व्यासंगी व चिकित्सक पत्रकार आहेत. २००९ मध्ये महाराष्ट्र राज्यात विधानसभेच्या निवडणुका जाहीर झाल्यावर त्याबद्दलच्या वस्तुनिष्ठ स्वरूपातील बातम्या आपल्या वाचकांपर्यंत कशा पोहोचतील हे ते स्वत: पत्रकार या नात्याने पाहातच होते; परंतु रजनीश जोशी यांचे तेवढ्यावर समाधान होत नव्हते, असे वाटते. प्रत्यक्ष घडणाऱ्या घटनांच्या पलीकडेही सामाजिक जीवनात काही एक अर्थपूर्ण वास्तव आहे व त्याचे आपण निवेदन केले पाहिजे असे त्यांना उत्कटत्त्वाने वाटले असणार. ते वास्तव म्हणजे राजकारणातील व्यक्तींचे राजकीय वर्तन व त्याबद्दल उत्स्फूर्तपणे प्रतिक्रिया प्रकट करणारे जनसामान्यांचे लोकमानस. हे लोकमानस सर्वसामान्य वाचकांपर्यंत पोहोचविण्यासाठी त्यांनी निवडणुकीच्या कालावधीत दररोज लिहिलेले सदर म्हणजे चावडीवरच्या गप्पा!

हे सदर लिहिण्यासाठी रजनीश जोशी यांनी गावगप्पा सांगण्याची जी क्लृप्ती योजिली आहे ती मोठी मार्मिक आहे. या सांगून-सवरून गावगप्पाच आहेत म्हटल्यावर त्या शंभर टक्के सत्य अथवा अधिकृत आहेत असा दावा कुणीच करणार नाहीत. तरीही या लेखनातून राजकीय घटनांबद्दल लोकांच्या बौद्धिक, भावनिक प्रतिक्रिया, शेरे, अभिप्राय प्रकट होतात व त्यातून लोकमानस यथार्थपणे प्रतिबिंबित होते. वृत्तांकनाच्या कल्पनेचा लेखकाने केलेला, हा विकास म्हणावा लागेल.

लोकमानस प्रकट करण्यासाठी लेखकाने पाटील, गणप्या, हणम्या, हैब्या, पांडा अशी पात्रांची निर्मिती केली आहे. या प्रत्येकाला लेखकाने जाणीवपूर्वकच स्वतंत्र व्यक्तिमत्त्व बहाल केले नाही. कारण या सगळ्यांच्या तोंडून त्याला सामान्य स्वरूपात लोकांच्या भावना प्रकट करावयाच्या आहेत, मतप्रदर्शन करावयाचे आहे. याच कारणाने लेखकाने आपले व्यक्तिमत्त्वही लेखनातून प्रकट होऊ दिले नाही. ही भूमिका घेतल्याने वृत्तपत्राच्या वार्तामध्ये जो भाग येऊ शकत नाही तो लोकमानसाचा भाग या सदराद्वारा लेखक प्रकट करू शकला आहे.

निवडणूक जाहीर झाल्यापासून तो निवडणुकीचा निकाल लागेपर्यंतच्या काळातील विविध घटनांवर लोकांनी केलेले भाष्य या चावडीवरच्या गप्पांमध्ये आपल्याला पाहावयास मिळते. हे भाष्य अनेक दृष्टिकोनांतून केलेले आहे. ही उमेदवारी कोणाला मिळते? ती केवळ काका-पुतण्यापर्यंत मर्यादित राहील याची खात्री नसते; तर एकाच घरातील अनेकजणांकडे ही सत्तापदे जाण्याची आशंका प्रकट केली जाते. तमाशातील नृत्यकलावतींना महिला म्हणून उमेदवारी मिळेल की काय अशी सभय शंका येऊन महिला म्हणून मेधा पाटकर यांसारख्या महिलांना उमेदवारी का देऊ नये, अथवा लोकप्रियतेचाच निकष लावायचा झाला तर एखाद्या ह.भ.प.ना उमेदवारी का देऊ नये अशी सूचनाही केली जाते. कामगारांचे नेते म्हणवणारे कामगारांचे खरे हीत पाहत नाहीत, संप करायला लावणे, बंद पाडणे या नकारात्मक धोरणांवर, माणसाला अन्नाला लावण्याऐवजी उपाशी मारण्यावर या नेत्यांचा भर असतो, असा शेरा आपल्याला ऐकू येतो. वर्षानुवर्षं एका पक्षात राहून अनेक फायदे मिळविलेले असता केवळ एका वेळेस उमेदवारी मिळाली नाही म्हणून पक्षांतर करू पाहणाऱ्यांच्या वृत्तीबद्दल तीव्र नाराजी प्रकट केली जाते. पक्षात कोणी काम करायला येत नसतो, येतो तो तिकीट मागायला; आणि तिकीट मिळाले नाही तर बंडखोरी करायला! अशी



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

उपरोधिक प्रतिक्रियाही चावडीवर ऐकायला मिळते. पूर्वी निवडून आलेल्या उमेदवाराचे वर्तन लोकांना माहीत असे. सत्ता कायम राहणार नाही तेव्हा 'मिळालं की वरप' असेच सारे करतात असे निरीक्षणही इथे बघायला मिळते. मात्र लोक राजकीय व्यक्तींचे केवळ दोषच पाहतात असे नव्हे. कर्तृत्व दिसले तर त्याचे कौतुक करायलाही ते उत्सुक असतात, असेही या गप्पांतून दिसते. म्हणूनच बचत गट, तरुणांचे संघटन, कॉलेजच्या गरजू मुलामुलींसाठी रोजगार या बाबतीत विधायक कार्य करणाऱ्या 'ताई'चा चावडीवर-गौरवाने उल्लेख होतो. एकंदरीत, रजनीश जोशी यांनी चावडीवरील गप्पांमधून लोकमानस अनेक अंगांनी अभिव्यक्त केले आहे.

चावडीवरच्या या गप्पा ग्रामीण भाषेत रंगविण्याचे कसबही जोशी यांच्या ठिकाणी आहे. वृत्तपत्रातील अशा प्रकारचा सदरचा मजकूर वाचनीय होण्याच्या दृष्टीने खुसखुशीत, मार्मिक व प्रसंगी विनोदात्मक असणे आवश्यक असते. रजनीश जोशी यांच्या ठिकाणी अशा प्रकारचे आवश्यक असणारे लेखनप्रभुत्व आहे. प्रत्येक दिवसाच्या मजकुराची शीर्षके प्रासयुक्त, अर्थपूर्ण व मजकुराला 'चाळ माझ्या पायात, कळ तुझ्या हृदयात' असे खुमासदार शीर्षक दिले आहे. निवडणूक प्रचारार्थ सलमान खानसारख्या नटाला फिरविण्याच्या प्रकाराबद्दल लिहिताना 'कपडे घातलेला सलमान अन् कपडे फाटलेला पब्लिक' असे भेदक शीर्षक दिलेले आहे. 'सपाट', 'कोठे?', 'प्रताप' इ. शाब्दिक कोट्या खुसखुशीत आहेत, तर 'जाई-जुई', 'कमळ' इ. शब्द अभिप्रेत निर्देश पारदर्शकपणे करणारे आहेत. तसेच लेखनाची रोचकता वाढविणारे आहेत.

निवडणुकीच्या काळात रजनीश जोशी यांचे हे सदर 'दै. सकाळ'मधून क्रमशः प्रसिद्ध होत असताना वाचकांनी या लेखनाचा आस्वाद मनापासून घेतला. आज या लेखनाचा विशिष्ट निवडणुकीचा संदर्भ मागे पडला असला तरी राजकीय व्यक्तींच्या वर्तनाचा व लोकस्वभावाचा संदर्भ कायमस्वरूपी आहे. त्यामुळे या लेखनाचे मोल टिकून राहील. शिवाय रजनीश जोशी यांच्या लेखनशैलीची रोचकता हेही एक कारण आहे. त्याशिवाय आणखी एक महत्त्वाचे कारण आहे ते हे, की श्री. रजनीश जोशी आपल्या लेखनात निर्देशिल्या जाणाऱ्या साऱ्याच व्यक्तींकडे पूर्वग्रहित निकोप दृष्टीने, समभावाने व प्रेमपूर्ण वृत्तीने बघतात. असा समंजस, व्यापक दृष्टिकोन ठेवून राजकीय संदर्भात लिहिणे सोपे नसते; परंतु वृत्तीचा हा प्रगल्भपणा व दृष्टिकोनाचा व्यापकपणा श्री. रजनीश जोशी यांच्या ठिकाणी असल्याने त्यांच्या या लेखनाचे मोल अबाधित राहील, असा मला विश्वास वाटतो.

◇◇◇

**गो. मा. पवार**
सोलापूर


मराठी साहित्यसृष्टीतील अभिनव उपक्रम
म. सा. परिषदेने सिद्ध केलेला
अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास

**A History of Modern Marathi Literature**

संपादक ·
**श्री. राजेंद्र बनहट्टी,**
**डॉ. गं. ना. जोगळेकर**

**भाग-१ पृष्ठसंख्या ३५०, किंमत रु. ४००/-**
**भाग-२ रु. ६००/-**
ग्रंथ विक्रेत्यांना भरपूर सूट.
वैयक्तिक ग्राहकांनीही सवलतीसाठी संपर्क साधावा.

: मागणीसाठी संपर्क :
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत

अनुक्रमणिका

## 'वक्तृत्व प्रबोधनाचा चारा'

– प्राचार्या डॉ. दीपा देशपांडे

वक्तृत्व समाजाचे ललित्यपूर्ण प्रबोधन करते. ज्ञानवंतांचे ज्ञान त्यांच्या वक्तृत्वातून प्रकाशित होते. ग्रंथोदयापूर्वीच्या काळात वक्तृत्वाने फिरती ज्ञानपोई चालविली. वक्तृत्व ही प्रयोगात्मक ललित कला आहे. वक्त्याने विषयाची नाडी व शब्दांचा विश्वास संपादन केला पाहिजे. वक्तृत्वाकडे आंतरिक संस्कारशीलता आहे. लेखक आपले शब्द कागदावर उमटवितो, तर वक्ता शब्द श्रोतृहृदयावर उमटवितो. म्हणून वक्तृत्वाकडे पाहताना त्यांचा साहित्य म्हणून विचार व्हावा असा आग्रह असेल तर 'वक्तृत्व' म्हणजे काय? वक्तृत्वाचा पाया आणि परंपरा, वक्तृत्व सादरीकरण, वक्तृत्वासाठी करावा लागणारा व्यासंग; व्यासपीठ संस्कृती, वक्तृत्वाचे तंत्र याची सांगोपांग माहिती करून घेणे आवश्यक आहे.

'वक्ता दशसहस्त्रेषु' असे म्हटले जाते. म्हणून वक्ता होण्यासाठी सुद्धा 'प्रतिभा' असावी लागते. केवळ 'प्रतिभा' असूनही चालणार नाही. त्याकरिता योग्य, नेमके, अचूक, प्रभावी मार्गदर्शन आवश्यक आहे. म्हणूनच प्रा. संजय थोरात यांच्या 'वक्तृत्व' या पुस्तकातून वक्तृत्व वृद्धिंगत करणाऱ्या वक्त्याला आवश्यक ते मार्गदर्शन होणार आहे. वक्तृत्व हे जनसंवादाचे प्रभावी माध्यम आहे. हे माध्यम अधिक प्रभावी करण्याचे तंत्र, प्रयत्न कोणते असावेत याची अभ्यासपूर्व मांडणी या पुस्तकात लेखकाने केली आहे.

हे पुस्तक वैचारिक प्रबोधनाचा मार्ग जसा दाखवते; तसेच प्रसंग, विनोद सांगण्यासाठी छोट्या चौकटी व व्यंगचित्रांचा वापर यामध्ये केला असल्याने ही शब्दचित्र कृती वाचकाचे मन आकर्षून घेते. अतुल जगताप यांच्या व्यंगचित्रांमुळे नववक्त्याला सुद्धा बळ मिळेल यात शंका नाही.

राजकीय, सामाजिक, शैक्षणिक क्षेत्रातील समकालीन वक्त्यांना शैलीचा परिचय करून दिला आहे. त्याबरोबरच समकालीन व्यासपीठावर वक्तृत्वाची वेगाने होणारी घसरण रोखण्यासाठी उपाय सुचविले आहेत. वक्तृत्व प्रयत्नसाध्य असून ते प्रत्येकास सुधारता येते असा विचार मांडला आहे. प्रस्थापित व्यवस्थेला छेद न देता, कुणालाही न दुखावता बोलणाऱ्या रंजनवादी वक्त्यांच्या मर्यादा स्पष्ट केल्या आहेत. पौर्वात्य व पाश्चात्त्य नामवंत वक्त्यांची भाषणातील नेमकी उदाहरणे दिली आहेत. त्यामुळे ते वाचनीय झाले. उदाहरणार्थ — "प्लीज! गैरहजर महिलांची नावे सांगा, म्हणजे मला त्यांच्यावर बोलता येईल." किंवा "राज्यातील मानांकित वक्ते आज इथे आले आहेत. साहेब! आपलं नाव काय?' इत्यादी किस्से मनाला गुदगुल्या करून जातात.

वक्तृत्व : प्रा. संजय थोरात
प्रकाशन : स्नेहांकित प्रकाशन, क्रांतिसिंह
मोना पाटील नगर, इस्लामपूर, जि. सांगली.
पाने : ११९
किंमत : शंभर रुपये

❖❖❖

**प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे**
आर्ट्स आणि कॉमर्स कॉलेज, आष्टी



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

पुस्तक परीक्षण

## 'मावळती'— जाणिवा समृद्ध करणारे लेखन - ज्योत्स्ना देवधर

– रागिणी पुंडलीक

आकाशवाणी-पुणे केंद्रावरील चाळीस-पन्नास वर्षांपूर्वीची 'गृहिणी'मधील वहिनी, 'मावळती' पुस्तकातून पुन्हा भेटली – ज्योत्स्नाबाई देवधर. तशा त्या, त्या काळातल्या कथा-कादंबरी लिहिणाऱ्या समाजप्रिय लेखिका होत्या. त्यांची 'कल्याणी', 'घर गंगेच्या काठी' या कादंबऱ्या-नाटक-सिनेमाद्वारे खूपच गाजल्या. आकाशवाणीतून त्या निवृत्त झाल्यावर आणि घरगुती कलह, जीवनसाथी व मुलाच्या मृत्यूच्या दु:खाने त्या थोड्या पडद्याआड झाल्या; पण 'मावळती'च्या लेखनाने त्या पुन्हा प्रकाशात आल्या, लिहित्या झाल्या. छान वाटलं. आनंद झाला.

कुठलंही काम त्यांनी, मनापासून, जीव ओतून केलं. त्या वेळी टी.व्ही. हे माध्यम नसल्याने त्या 'गृहिणी'मधून फार लोकप्रिय आवडत्या लेखिका म्हणून गाजल्या होत्या. यातून त्यांनी भगिनी वर्गाला सर्वार्थाने शहाणं, ज्ञानी करीत, स्वत:ही नानाविध विषय व अनुभव घेत, प्रगल्भ झाल्या. या कार्यक्रमातून त्यांनी भाषणं, लेख, कविता, ओव्या, निरनिराळ्या पाककृती, बाळांच्या संगोपनापासून आहारशास्त्रापर्यंत सगळे विषय साहित्यिक अंगाने वळण देत सादर केले. म्हणून त्यांच्या लेखनाला अल्पाक्षरी, भाषा, अर्थबहुल चित्रमयी भाषा अशी इतर लेखकांनी बिरुद दिली, गौरवलेही. अवघड लिहिणं सोपंय, पण सामान्य माणसांना रुचेल अशा साध्यात साध्या लयमय भाषेत लिहिणे फार अवघड. अशा लेखणीचा प्रत्यय एकोणनव्वदाव्या वर्षी 'मावळती' हे ललित लेखन करून त्यांनी वाचकांना पुन:प्रत्ययाचा आनंद दिला आहे.

आजपर्यंतच्या आयुष्यातील निवडक, ठाशीव, पण बहुरंगी अनुभव सांगताना त्यांचे सामाजिक भान ठसठशीतपणे उमटले आहे. हे सांगताना त्यांचे चिंतन, त्यांचे सुदृढ विचार, त्या विचारांची चहुअंगी मांडणी त्यांनी ललित अंगाने आपल्यापुढे मांडली आहे. हे अनुभव आपल्यालाही आलेले, जाणवलेले असतात; आणि मग वाटत राहतं, खरंच की, अगदी बरोबर आहे त्यांचें म्हणणं!

खरं म्हणजे ज्योत्स्नाबाई मारवाडातून पुण्याला आल्या. मातृभाषा हिंदीतून त्यांचे शिक्षण झाले. पण त्यांनी जिद्दीने मराठीचे अफाट वाचन करून, ती लेखन करण्याइतकी आत्मसात केली. हे सगळं लेखनच अतिशय वेधक, ललितशैलीतून मनापासून केलेलं, म्हणून ते वाचकांना आपलंसं करतं.

पती आणि मुलगा ह्यांच्या मृत्युमुळे झालेल्या अपरंपार दु:खाने, शरीर-मनाची तोडफोड होत असतानाही त्यांनी त्या उदास, दु:खमग्न अवस्थेत, मनाशी संवाद करीत आपले हसरे जीवन 'मावळती'तून व्यक्त केले आहे, हे कौतुकास्पद आहे.

त्यांचे लेखन तसे स्त्रीकेंद्री असले तरी त्याचे दु:ख त्या अतिशयोक्तीने मांडत नाहीत. हे त्यांच्या 'रे मुरली धरा' या ललित आध्यात्मिक लेखात दिसून येते.

'साकव' हा लेख लिहिताना त्या भूत, वर्तमानकाळालाच 'साकव' घालतात. जाता जाता निसर्गचित्रेही आपल्यापुढे उभी करतात. 'मन' या लेखात मैत्रिणीच्या अवस्था बघून, त्यांच्या संवेदनशील मनाच्या यातना त्या बहिणाबाईंचा हात धरून, 'माझं मन आता होतं भुईवर, आता गेलं आभाळात... त्याला पंख पसरू दे, मुक्त विहरू दे' – असे शहाणपणाचे विचारही त्या बोलून दाखवतात.

'ज्याचे वागणे त्याच्यापाशी. जाऊ देगं' हे साधे तत्त्व त्या लेखातून आचरणात आणतात. वाचकांना आणायला लावतात.

'दुधावरची सायी'त शेवटी वरवर साधंसुधं वाक्य लिहून त्या वाचकाचे प्रबोधन करतात. 'वर्तमानानं धडा दिला. अलीकडे दुधातला कस कमी झाला. ओशटपणा उणा उणा झाला.' 'गृहित' मधली सासू-मुलींची सर्वमान्य कहाणी सांगता सांगता, त्यांना मर्मबंधातली ठेवच हाती आली. साध्यासुध्या प्रसंगातून त्या खूप काही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

सांगून जातात. स्वत: आत्मसात् करून वाचकांनाही जागे करतात.

'नदीला एकादशी' या लेखात शाळेतील मास्तरांची कहाणी ऐकवताना – आईबापांनी फक्त कर्तव्यानं जगायचं. अपार कष्टाने यश मिळतंच असं नाही. आयुष्य म्हंणजे Life is writing without eraser असा विचार त्या मांडतात. ही दृष्टी 'मावळती' या पुस्तकातील सर्व लेखांतून दिसून येते. दोन पिढ्यांमधील आचारविचारांचे अंतर इतक्या वेगाने वाढते आहे; हेही त्या उदाहरणांनी व्यक्त करतात.

'सध्याच्या कुटुंबात म्हाताऱ्या माणसाला सामावून चौकोनी कुटुंबाला पंचकोनी, षट्कोनी करणे परवडणारे नाही!' अशा विचारातून त्या स्वाभाविक वात्सल्य, प्रेम, आदर, नात्यातील तुटत तुटत चाललेले लागेबांधे, कुटुंबातील परंपरेला छेदून वेगाने होणारी मोडतोड त्यांना सतत सलत राहते. यात होरपळत निराधार होणारे वृद्ध त्यांना बघवत नाही.

माणसाची आर्थिक वंचना कमी होऊन तो श्रीमंत वर्गात वेगाने जातो आहे, सद्यकालीन विज्ञानाच्या प्रगतीमुळे बाल्यानंतर तारुण्याचा सहजपणे केलेला स्वीकार, त्या मानाने माणूस वृद्धावस्था स्वीकारायला सहज तयार होत नाही, याचाही विचार त्या आपल्या लेखनात करतात. त्यावरून हल्ली सुख-मरणाचा किंवा इच्छा मरणाचा विचार आणताना डोंगराएवढ्या अडचणी येतात. आपल्याकडील प्रायोपवेशन, जैन संप्रदायातील सल्लेखना या संकल्पना, त्यासाठीचा निग्रह, विनासायास शांत चिरंतन 'सुखनिद्रा' हवी असे वाटणाऱ्या ज्येष्ठांची संख्या नक्कीच वाढते आहे. पण आपल्या मनावरील परंपरेने मांडलेले पाप-पुण्याचे विचार सतत आड येतात. समाज व्यवस्थेच्या दृष्टीने हे बरं आहे की वाईट याचा विचार त्यांना सांगता येत नाही, ते तो वाचकांसमोर योग्य शब्दांत मांडतात.

'मावळती'चे वाचन करताना वाचकही तारुण्य, म्हातारपण, वृद्धपणा, त्याबरोबरच भूतकाळ, वर्तमानकाळ या सर्वच पायऱ्या ओलांडून जातो.

सर्व लेख छोटे छोटे दीड पानी असले, तरी त्यात छोट्यामोठ्या मानवी संबंधांचे, स्वभाव वैशिष्ट्याचे, दर्शन घडवितात. सर्व लेख वर्तमानपत्रात येऊनही ते कुठेच वर्तमानपत्री झालेले नाहीत. हे ह्या पुस्तकाचे वेगळेपण! बहिणाबाईंना गुरुसमान मानून त्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्या प्रत्यक्षात जगताहेत, आपल्याला जगायला सांगताहेत– माझं सुख हंड्या झुंबरा टांगलं!
माझे दु:ख तळघरात कोंडलं!!

◇◇◇

**रागिणी पुंडलिक**
१४५६, सदाशिव पेठ पुणे ४११ ०३०
फोन नं. २४४६०२३८

मराठी वाङ्मयाच्या संशोधकांना उपयुक्त शाळा आणि महाविद्यालये
तसेच ग्रंथालयांनी अवश्य संग्रहात ठेवावी अशी

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका सूची**

(१९१३ ते २००४)

**सूचीकार : डॉ. मीरा धांडगे**

पृष्ठे (रॉयल) २५६ + ४ मूल्य रु. ४००/- सवलतीत रु. ३००/- म. ऑ. किंवा
डी. डी. ने पाठविल्यास रजि. बुक पोस्टाने घरपोच.

: मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे – ४११ ०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

# गांधीजींचा सर्वोदयी साहित्यविचार

– डॉ. सुहास पुजारी

महात्मा गांधी यांच्या आचार-विचारांनी अवघ्या जगाला मोहित आणि प्रेरित केले आहे. त्यांची विभूती ही एक मोहनमाया आहे याची प्रचिती जसजसा काळ पुढे धावतो आहे, तसतशी येऊ लागली आहे. गांधीविचारांची मौलिकता काळाने सिद्ध केली आहे. गांधी न समजून घेण्याइतके मोठे नुकसान कोणतेही नाही हे आता उमजू लागले आहे. म्हणूनच गांधीजींच्या चरित्राचे आणि विचारांचे सहस्रावधी साहित्यदीप सर्वच भाषाप्रदेशात तेवत आहेत. निशिकांत ठकार यांच्या 'गांधीजींचा साहित्यविचार' या ग्रंथाच्या रूपात आणखी एक दीप उजळला आहे.

महात्मा गांधी यांच्या बहुरूपी व्यक्तित्वातील एक रूप म्हणजे साहित्यिक गांधी होय. गांधीजींनी विपुल लेखन केले. ते गुजराती साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते. प्रतिभावंतांशी त्यांचा संवाद होता. त्यांच्या आत्मकथेने गुजराती साहित्याप्रमाणेच अन्य भाषांतील साहित्यावरही आपला प्रभाव टाकला. गांधीजींनी जीवनाच्या विविध अंगांचा विवेकबुद्धीने विचार केला होता. त्यात साहित्यही होते. त्यांच्या लेखनात विखुरलेले हे साहित्यचिंतन निशिकांत ठकार यांनी वेचले आहे. साहित्य व भाषेसंबंधीच्या गांधीजींच्या विचारांचा शोध घेऊन तो त्यांनी या ग्रंथात साक्षेपाने मांडला आहे.




'गांधीजींचा साहित्यविचार' या ग्रंथाची रचना वैशिष्ट्यपूर्ण आहे. साहित्य-संस्कृती आणि अध्यात्म, साहित्य-सत्य आणि सौंदर्य, साहित्य-भाषा आणि शैली, साहित्य-कवी आणि कविता, साहित्य-वाचन आणि समीक्षा असे पाच पैलू यात प्रामुख्याने प्रकटले आहेत. या सर्वातून घडणारे एका महात्म्याचे दर्शन अशी गांधीजींच्या षड्दर्शनांची ही मोहनमाळ आहे.

साहित्य-संस्कृती आणि अध्यात्म या पहिल्या भागात साहित्य म्हणजे सत्याचा आग्रह. साहित्यालाही नैतिक आध्यात्मिक अधिष्ठान असले पाहिजे. लेखन कोणतेही असो, ते लेखकाच्या आत्मप्रतीतीतून आले पाहिजे. साहित्य रसपूर्ण असावे. सात्त्विक साहित्य जनसामान्यांना सुसंस्कृत करते. त्यांची नैतिक जाणीव वृद्धिंगत करते. लेखकाच्या जीवननिष्ठेची प्रत त्याच्या नैतिक भूमिकेवरून ठरते. साहित्याचे प्रयोजन हे 'आत्मदर्शन' असावे. साहित्याने माणसाला सुसंस्कृत करावे. निर्भय बनवावे. त्याची जीवननिष्ठा दृढ करावी. साहित्यातून सत्याचे दर्शन घडावे. देशहित व सुधारणेला ते साहित्यापेक्षा अधिक महत्त्व देतात. गांधीजींच्या विचारप्रणालीतून 'सर्वोदय' हे साहित्याचे सर्वश्रेष्ठ प्रयोजन ठरते.

'शाश्वत मूल्यांचा शोध घेणे' हेच साहित्याचे अध्यात्म होय, असे गांधीजींना वाटते. साहित्यातील अध्यात्माचा संबंध स्वानुभूतिनिष्ठ श्रद्धेशी असतो. असे गांधीजी मानत होते याकडे ठकार लक्ष वेधतात. हा साहित्य विचार केवळ एका साहित्यिकाचा नाही तर तो एका जीवनचिंतकाचा, एका सत्याग्रही व्यक्तिमत्त्वाचा, एका राष्ट्रपित्याचा आणि एका महात्म्याचा आहे.

'साहित्य – सत्य आणि सौंदर्य' हा अनुबंध गांधीजींच्या साहित्य विचारांच्या आधारे उलगडताना काही



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

मननीय विचार प्रकट झाले आहेत. आत्मनिष्ठा हा साहित्याचा सर्वांत महत्त्वाचा गुण आहे. असे गांधीजींचे मत होते. यासंबंधी ठकार लिहितात, 'आतला आवाज' ही गांधीजींची एक विलक्षण संकल्पना होती. तो 'आतला आवाज' म्हणजे आत्म्याचा आवाज, म्हणजेच आत्मनिष्ठा. गांधीजी जे काही लिहीत वा बोलत असत; ते असे स्वतंत्र आणि स्वाधीन असे. कुणाला पटो वा न पटो, ते आपले मत आग्रहाने मांडत असत. त्यात अभिनिवेश नसे; पण ठामपणा असे. चूक सुद्धा आपली स्वत:ची असावी. दुसऱ्याची नक्कल नसावी.'' (पृ. ३४) अशा अगदी प्रासादिक शैलीतील विवेचनाद्वारे गांधीजींचा विचार ठकार वाचकांसमोर ठेवतात.

'स्वत:चा शोध घेणे हा जर सत्याग्रह असेल तर मग लेखन हाही सत्याग्रहाचाच आविष्कार म्हणावा लागेल.' (पृ. ३७) लेखनातील या सत्याग्रहाच्या आविष्काराने गांधीजींना फक्त मतपरिवर्तन किंवा विचारपरिवर्तन अभिप्रेत नाही. ते भावबदल घडवून आणू इच्छितात. गांधीजींची साहित्य दृष्टी अशी उदार, उदात्त, महन्मंगल, बहुजनहितवादी असल्याचे त्यातून स्पष्ट होते.

निशिकांत ठकार यांनी गांधीजींच्या सौंदर्यजाणिवे-संबंधीचा शोध त्यांच्या कलाविषयक प्रतिसादातून व त्यांच्या लेखनात प्रकटलेल्या विचारांतून फार उत्तम रीतीने घेतला आहे. गांधीजी नाटकांचे चाहते होते, चित्रकलेचे प्रशंसक होते, त्यांच्या रूप, रस, गंध, नाद, स्पर्श या संवेदना तल्लख होत्या. साधेपणा, स्वच्छता यांना त्याच्या सौंदर्यजाणिवेत महत्त्वाचे स्थान होते. कलांचे प्रयोजन सौंदर्य असते पण गांधीजी सौंदर्य हे सत्यावेगळे तत्त्व मानत नाहीत. (पृ. ४४)

'साहित्य – भाषा आणि शैली' या भागात गांधीजींचे मातृभाषेसंबंधीचे गाढ प्रेम, तसेच भाषा व साहित्याविषयीचे त्यांचे देशीवादी विचार नेमकेपणाने ठकार यांनी वेचले आहेत. भारतीय लेखकांनी आपल्याच वातावरणात किंवा पर्यावरणात आपले साहित्य विकसित केले पाहिजे. (पृ. ४९) 'उच्च आशय आणि साधी भाषा हेच साहित्यकृतीचे लक्षण आहे.' (पृ. ५१) साधन शुचितेला गांधीविचारात महत्त्वाचे स्थान आहे. त्यामुळे भाषा शुद्ध, निर्दोष व पवित्र असली पाहिजे असे त्यांना वाटते. शैली म्हणजे भाषेतून जाणवणारे लेखकाचे व्यक्तिमत्त्व. (पृ. ५५) 'कला ही नैसर्गिकपणेच साधी असते.' (पृ. ५५) गांधीजींचा भाषाशुद्धीचा आग्रह होता, पण त्यांचा विरोध भाषेविषयीच्या गुलामी मनोवृत्तीला होता, याकडे ठकारांनी लक्ष वेधले आहे. चांगली भाषांतरे व्हावीत. शब्द निवडीतील कौशल्य, शब्दयोजनेतील सावधवृत्तीला गांधीजी महत्त्व देतात, याचीही नोंद ते करतात.

'साहित्य – कवी आणि कविता' यात कवितेने आपल्या जगण्यावर परिणाम केला पाहिजे. कविता जगण्यातून आली पाहिजे. काव्यार्थ उत्क्रांतिशील असतो. अनेकार्थसूचकता किंवा सतत समकालीन राहण्याची क्षमता ही गीतेची लक्षणे तिला सर्वोत्तम ग्रंथाचा सन्मान देतात. (पृ. ८५) असे गांधीजींचे विचार मांडले आहेत.

'साहित्य – वाचन आणि समीक्षा' यामध्ये प्रकटलेली गांधीजींची समीक्षेतील समग्रबोधाची जाणीव महत्त्वाची आहे. त्यांची समीक्षादृष्टी गुणग्रहणाची आहे. ग्रंथाची शलाका परीक्षा त्यांना अन्याय्य वाटते. खरी ग्रंथपरीक्षा म्हणजे आंतरिक परीक्षा असे ते मानतात. गांधीजी जीवनाकडे समग्रदृष्टीने पाहतात. त्यामुळे एखाद्या दोषाकडे पाहून तो ग्रंथ अथवा ग्रंथकारच नाकारणे त्यांना अनुचित वाटते. वाचनीयता हा उत्तम साहित्याचा पहिला निकष, असे त्यांचे मत होते. गांधीजी आपण प्रत्यक्ष जगत असलेल्या जीवनापेक्षा कोणत्याही कलेला मोठी मानत नाहीत; (पृ. ५०) कारण गांधीजी पक्के जीवनवादी आहेत. गांधीजींचा साहित्यविचार हा एका अर्थाने त्यांचा जीवनविचारच आहे.

गांधीचरित्रातील मर्मस्पर्शी दाखले, त्यांचे



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

जीवनव्यवहारातील नैतिकतेविषयीचे सहज सावधपण, त्यांची जीवननिष्ठा, राष्ट्रप्रेम, बहुजनहितवादी दृष्टी, साहित्य, संगीत, शिल्प याविषयीची त्यांची संवेद्यता, 'काळा गोरा वंशभेद हा कधी न त्या शिवला । मानवतेचा खरा पुजारी चिरंजीव ठरला ॥' याची प्रतीती देणारी त्यांची झुलू लोकांकडे पाहण्याची सौंदर्यदृष्टी अशी बहुपेडी मोहनमाया या साहित्य-विचारांच्या स्वरूपात प्रकटली आहे. गांधीजींची एक लाख पत्रे संकलित झाली आहेत. म्हणजे आयुष्यातील प्रत्येक दिवसागणिक किमान चार पत्रे त्यांनी लिहिली. आपले सगळे व्याप-ताप सांभाळत, राष्ट्राची चिंता वाहत बहुतांची अंतरे त्यांनी राखली, जाणली.

एखाद्या लेखकाच्या, तत्त्वचिंतकाच्या विचारांचा मागोवा किती सूक्ष्म स्वरूपात व आस्थापूर्वक घेतला जाऊ शकतो याचे एक उदाहरण म्हणून या पुस्तकाकडे पाहता येऊ शकेल. गांधीजींची राहणी साधी होती. जीवनशैली साधी होती, पण त्या साधेपणातही मूल्यात्मक ऐश्वर्य होते. गांधीजींचा साहित्यविचार या ग्रंथाची रचना आणि भाषाशैली साधी सरळ आहे तरीही तिच्यात अंगभूत ऐश्वर्य आहे. पानातून पान फुटावे, त्याप्रमाणे विचारांतून विचार प्रकटतो. एका विचारसूत्रातून दुसऱ्या विचारसूत्रात सहजशैलीत मिळून गेलेले हे विचारविवरण आहे.

साधी राहणी व उच्च विचारसरणी ही गांधीजींची ओळख. त्याप्रमाणेच साधी भाषा व उच्च आशय अशी प्रतीती या लेखनातून येते. गांधी समजून घ्यायचे झाले तर आपणाला नकळत गांधी व्हावे लागते हेच खरे! ठकारांमधील लेखकाच्या, तत्त्व-चिंतकाच्या बाबतीत नेमके हेच झाले आहे.

प्रा. निशिकांत ठकार यांनी गांधीजींचा साहित्य विचार मांडताना त्यावर खास आपल्या शैलीत भाष्य केले आहे. त्याची ही काही उदाहरणे, 'ही सौंदर्यजाणीव केवळ साम्राज्यविरोधासाठी आहे असे नाही म्हणता येणार.' (पृ. ४३), 'शैलीबाज नसलेली शैली म्हणजे गांधीशैली.' (पृ. ४३), 'एकएक झाडझुडूप तपासत असलेल्यांना संपूर्ण अरण्याचा आवाका कळणे शक्य नाही.' (पृ. ४३)

गांधीजींची लेखनमग्न कृष्णधवल मुद्रा ग्रंथाच्या मुखपृष्ठावर आहे. गांधीजींचे एखादे रंगीत छायाचित्र मुखपृष्ठावर छापून ग्रंथाची आकर्षकता वाढविण्याचा मोह टाळला आहे. हे कलात्मक मूल्यशिरोष घाटेंनी सांभाळले.

लेखन करणारे गांधीजी, स्वत:चे वस्त्र स्वत: विणणारे गांधीजी, स्वत:चा परिसर स्वत: स्वच्छ करणारे गांधीजी, स्वत:चे अन्न स्वत: शिजवणारे व स्वावलंबनाचा आदर्श निर्माण करणारे गांधीजी, सेवा या अलौकिक भावात ईश्वराचे रूप पाहणारे गांधीजी, समाजहितासाठी स्वत: फकीर झालेले गांधीजी, अशी गांधीजींच्या षड्दर्शनाची ही मोहनमाळ रेखाचित्रांतूनही पाहायला मिळते. गांधीजींचे थोरपण, त्यांचे मुलखावेगळे व्यक्तिमत्त्व, त्यांची एकेक गुणमुद्रा आर. के. लक्ष्मण यांच्या रेखाचित्रणांतून गोचर झाली आहे. एम. के. गांधींना आर. के. लक्ष्मण यांनी कलेद्वारे केलेला प्रणाम म्हणजे ही रेखाचित्रे. एका प्रेषिताला एका प्रतिभावंताने केलेला प्रणाम!

'गांधीजींचा साहित्यविचार' हा ग्रंथ सर्वांनी अवश्य वाचावा असा आहे. कारण तो 'सर्वोदयी' आहे.

**गांधीजींचा साहित्यविचार**

प्रा. निशिकांत ठकार, सुविद्या प्रकाशन, सोलापूर,
पृष्ठे - १०८, मूल्य - १०० रु.

◇◇◇

**प्रा. डॉ. सुहास पुजारी**
संगमेश्वर कॉलेज, सोलापूर 'अक्षरपान',
७/८ मंत्री चंडक इस्टेट, किल्लेदार सांस्कृतिक
भवनाजवळ, होटगी रस्ता परिसर,
सोलापूर, ४१३ ००३,
स्थिरभाष ०२१७-२६०५५३४,
चलभाष ९९६०२७२०३१,
E.mail-suhaspujari18@gmail.com



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

म.सा.प.पुणेचे ग्रंथपाल

# स्व. प्रा. अनंत लक्ष्मण जोशी

– डॉ. श्रीकांत केळकर

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे एक कार्यवाह ग्रंथालयाचे संगणकीकरण व सुसज्जीकरण या कार्यात समर्पित भावनेने मग्न असणारे, ग्रंथपालनशास्त्र माहिती, संदर्भ या क्षेत्रातील तज्ज्ञ, म.ए.सो. च्या आबासाहेब गरवारे महाविद्यालयातील निवृत्त ग्रंथपाल लेखक, प्रकाशक, ग्रंथपाल-सूचिकार्य अनेक खंडांतून सिद्ध करणारे, शोधकार्य व संशोधनकार्य यात रमलेले आमचे जवळ जवळ ५२ वर्षांपासूनचे स्नेही प्रा. अनंतराव जोशी यांचे वयाच्या ७३ वर्षी अनपेक्षितपणे निधन झाले ही वार्ता आकाशवाणीवरून ऐकताना जाणवले, एक पर्व संपले! एक प्रसन्न व्यक्तित्व, मार्मिक, मिस्कील आणि मौलिक संभाषणातून हसतमुखपणे सतत स्नेहवर्षाव करणारे सत्प्रवृत्त, सदाचरण, गुणवत्ता आणि चारित्र्य यावर पूर्ण विश्वास असलेले, स्वत:च्या कामात पूर्ण निष्ठा असलेले, प्रयत्न, सातत्य, आत्मविश्वास, खंबीरपणा, निर्णयकौशल्य या गुणांच्या जोरावर विशाल लोकसंग्रहातून वेगवेगळ्या प्रकारांची कामे करण्यात मग्न असलेले प्रा. अनंतराव अधूनमधून भेटावयाचे. सहजपणे, जणू रोज भेटत असल्याप्रमाणे बोलावयाचे. या वर्षी मे महिन्यात, त्यांचा अनपेक्षितपणे दूरध्वनी आला. चांगले बोलणे झाले! तेच शेवटचे बोलणे ठरले.

सर परशुरामभाऊ महाविद्यालयात, १९५९ मध्ये त्यांचा परिचय झाला. आमचे आदरणीय प्रा. डॉ. श्री. र. कावळे यांचे बंधु, अनुज म्हणून एक वेगळाच जिव्हाळा होता. तो शेवटपर्यंत कायम राहिला. पुणे विद्यापीठातून अर्थशास्त्र विषय घेऊन एम.ए झाल्यावर काही काळ त्यापूर्वी पुणे विद्यापीठाच्या कचेरीत काम केल्यावर बंधूंच्या, दादांच्या सल्ल्याने आणि स्वत:च्या आवडीतून ग्रंथपालशास्त्राचे अध्ययन केले. व्यासंग वाढविला. व्यासंगाबरोबर संदर्भ, शोध, माहिती आणि नवे जाणून घेण्याची वृत्ती साहजिकच वाढत राहिली. डिप्‌लिब्., बी.लिब्., एम.लिब्. सारखे अभ्यासक्रम पूर्ण केले. स्वत: डॉ. कावळे उत्तम व्यासंगी, वाचनप्रिय आणि चिंतनशील ज्ञानोपासक होतेच. त्यांचा सहवास, मार्गदर्शन आणि स्वत:च्या सातत्यपूर्ण प्रयत्नातून एक सहृदय ग्रंथपाल, ग्रंथपालन शास्त्राचा जाणकार ग्रंथालय प्रशासनातील एक कार्यक्षम व्यक्ती, संशोधकाचा सहृदय स्नेही म्हणूनही, स्वत:ची अध्ययन, अध्यायने, प्रशासन-प्रकाशन मौलिक शोधकार्य ही जबाबदारी पार पाडताना डोळ्यांत भरण्यासारखी प्रगती केली. पं. महादेवशास्त्री जोशी यांच्यासारख्या सहृदय, भारतीय संस्कृती-कोश-कार्याचे प्रणेते, याची प्रस्तावना आणि प्रशंसा मिळविली. रसिक साहित्यासाठी त्यांनी लेखक, प्रकाशक, ग्रंथपाल इत्यादींची सूचि, साधार संदर्भ आणि स्पष्टीकरणासह अनेक खंडातून प्रसिद्ध केली व कोशकार शोधकर्ता म्हणून त्यांचे नाव आदराने घेतले जाऊ लागले. मानदंडासारखे मौलिक कार्य त्यांनी चिकाटीने, जिद्दीने व खंबीर निर्णय कौशल्यातून पूर्ण केले. गरवारे महाविद्यालय, पुणे विद्यापीठात व इतरत्र ग्रंथपाल, संघात, विविध प्रकारची कामे आणि जबाबदाऱ्या पूर्ण करताना, अभ्यासक्रम तयार करणे, सामग्री, संदर्भ, ग्रंथसूचि, माहिती संकलित करणे, संपादनही करणे, प्रत्यक्ष प्रयोगात





अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

आणणे आणि नव्या ग्रंथपालांना, अभ्यासकांना योग्य मार्गदर्शन करणे याकडेही लक्ष दिले. सतत काम करणारे अनंतराव स्नेही परिवारात प्रसिद्ध होते. डॉ. भांडारकर संस्थेचे प्रमुख ग्रंथपाल, संशोधकांचा मित्र व उत्तम संशोधक असलेल्या डॉ. वासुदेव लक्ष्मण मंजूळ, पुणे विद्यापीठातील संस्कृत प्रगताभ्यास केंद्राचे (CACS) ग्रंथपाल आणि तत्त्वतामधील पुरातत्त्वशास्त्र, इतिहास व भक्तिसाहित्य ह्यात सतत कार्य करणारे संशोधक डॉ. राजेश्वर पांडुरंगशास्त्री गोस्वामी आणि प्रा. अनंतराव हे ग्रंथपालन क्षेत्रातील आमचे तीन स्नेही आहेत. त्यांच्या स्नेहात राहण्यातच मोठा आनंद मिळाला. कोल्हटकर, हिंगवे, उमराणी, मेहेंदळे, पेठे, प्रभृती ग्रंथपाल तज्ज्ञांच्या परंपरेतील त्यांचे कार्य महत्त्वाचे ठरले.

डॉ. कावळे यांच्या बुधवारातील घरात एक दत्त मंदिर होते (खासगी). तेथे उत्सव, पारायण, ग्रंथवाचन, कीर्तन, प्रवचन, श्रवण आदी वैचारिक आणि धार्मिक कार्यक्रमांतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडणघडण झाली. डॉ. दादांच्या स्नेह, सौजन्य, सहानुभूतिपूर्वक, पण समर्थ मार्गदर्शनातून प्रा. जोशी यांची जीवननिष्ठा प्रशंसनीय होती. डॉ. कावळे यांच्या असाध्य व दीर्घकालीन दुखण्यातून आणि संस्थेतील अनुचित, भीषण, पण अपरिहार्य अशा संघर्षाच्या अनुभवातून वाटचाल करताना धैर्य, साहस, सहानुभूती, सक्रिय व सतत प्रयत्न, मनाचा निश्चय आणि खंबीरपणा इत्यादी गुणांच्या जोरावर, पण सत्प्रवृत्ती न सोडता दादांबद्दलची निष्ठा, स्नेह, अभिमान कायम राखत प्रा. अनंतरावांनी आपली योग्यता दाखवून दिली.

डॉ. कावळे यांच्या दहाव्या वार्षिक पुण्यस्मरणाच्या निमित्ताने कावळे, जोशी परिवाराने व्यक्ती आणि विचार असा गौरव ग्रंथ खासगी वितरणासाठी प्रकाशित केला. त्यात परिवार प्रमुख म्हणून प्रा. अनंतरावांनी त्याचे संपादन अत्यंत कौशल्याने सहृदयपणे, काटेकोरपणे आणि मार्मिकपणे पार पाडले. परिवाराच्या वतीने निवेदन आणि स्व. दादांना उद्देशून लिहिलेले पत्र अतिशय हृद्य आणि अंतःकरणास स्पर्श करणारे आहे. त्यात उभयतांच्या जीवननिष्ठेचे दर्शन घडते. आज दुःख होते ते दोन कारणांसाठी - 'माझी आयुष्यभर चाललेली धडपड, धावपळ तू पाहिलीस. पण आज शांत आणि स्थिर झालेले जीवन पाहण्यास तू नाहीस.' हे हृदयस्पर्शी वाटते. वडिलांच्या मृत्यूनंतर पाच महिन्यांच्या अनंतरावांचे सर्व काही दादांनी केले. त्यांच्या डोळ्यांतील आनंद अनंतरावांच्या विवाहप्रसंगी आणि शेवटी ८ जानेवारी १९९० ला साईनंदनमध्ये राहण्यास जाण्याच्या वेळी दिसला, कृतार्थ अश्रुपूर्ण दृष्टीत!

या ग्रंथाचे प्रास्ताविक डॉ. हेमंत इनामदारांनी सुंदर रीतीने केले; आणि त्यातील दादांचे लेख आणि स्नेह्यांची कार्यगौरवपर श्रद्धांजली व मौलिक प्रकाशचित्रे यामुळे गौरवग्रंथ, लक्षणीय ठरला.

बुधवारातील घर गेल्यानंतर दत्तमंदिरातील मूर्ती व चौथरा प्रा. अनंतरावांच्या घरात आहे आणि सर्व कार्यक्रम निष्ठेने पार पाडले जातात हेही कौतुकास्पद आहे.

नेहमीप्रमाणे २३ सप्टेंबरला दादांचा येणारा वाढदिवस आणि यावेळेस अनंतरावांवर गौरवलेख लिहिण्याची वेळ, हा एक दुर्दैवी योग आहे. पण हे अपरिहार्य आहे.

प्रा. अनंतरावांच्या स्मृतीस माझे प्रणाम आणि श्रद्धांजली.

◇◇◇

**डॉ. श्रीकांत मधुकर केळकर**
'श्रीशैलम्' धर्माधिकारी मळा, वासुदेव नगर,
सावेडी, अहमदनगर ४१४ ००३
फोन (०२४१) २४३०९६३,
९४०५५७०२६६



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## निवडक नवे

– उद्धव कानडे

*[महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे आलेल्या ग्रंथांपैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर.]*

### (१) माझ्या वैखरी वाणीचा प्रवास :

विद्यावाचस्पती, ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ डॉ. रा. गो. प्रभुणे यांचे हे आत्मचरित्र म्हणजे अनुभव, विचार, ज्ञान, संस्कार, अभ्यास आणि आचरण यांचा आदर्श ठेवा आहे. कराड, जि. सातारा येथे जीवनभर त्यांनी शिक्षण, साहित्य, सांस्कृतिक क्षेत्रात केलेले कार्य आणि जिवापाड जतन केलेली नीतिमूल्ये यामुळे प्रभुणेसरांचे हे आत्मकथन वाचकांना, अभ्यासकांना नव्या प्रकाशवाटेवर घेऊन जाते.

अध्ययन, अध्यापन आणि प्रबोधन करीत असताना संस्थेचे एक प्रमुख बनलेल्या डॉ. प्रभुणे यांच्या या आत्मकथनातून प्रकट झालेले त्यांचे त्यागी, विचारी, संयमी व्यक्तिमत्त्व कमालीचे विलोभनीय, प्रवाही, सर्वस्पर्शी आणि गुणसमृद्ध झालेले आहे. ज्येष्ठ साहित्यिक डॉ. द. ता. भोसले आणि डॉ. न. म. जोशी सरांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना या ग्रंथाला लाभली आहे. या दोन्ही मान्यवरांच्या प्रस्तावनेने या ग्रंथाची श्रीमंती वाढविली आहे.

या ग्रंथातला बावीस प्रकरणातला प्रवास वाचकांना विचारांच्या, चिंतनाच्या, मूल्यांच्या प्रकाशविश्वात घेऊन जातो. साने गुरुजी हे ज्यांचे दैवत आहे, ते डॉ. रा. गो. प्रभुणे आपल्या लेखनातून मधाळ, जिव्हाळ, आणि प्रेमळ भाषा वापरून वाचकांशी हृदयस्पर्शी नाते जोडण्यात यशस्वी झाले आहेत. कथा, कादंबरी, कविता, ललित, चरित्र, आत्मचरित्र असे जे वाङ्‌मयाचे विविध प्रकार आहेत त्यामध्ये आत्मचरित्राला एक वेगळे स्थान आहे.



डॉ. द. ता. भोसले यांच्या शब्दांत सांगायचे झाले, तर "जन्माला येणाऱ्या प्रत्येक माणसाचे आयुष्य एका साहित्यकृतीचा ऐवज असतो. मग तो माणूस राजवाड्यात राहणारा असो अथवा कोंडवाड्यात जगणारा असो." समाजाच्या विविध क्षेत्रांत वावरणाऱ्या माणसांनी आपापले आत्मकथन लिहिले, तर मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती समृद्ध झाल्याशिवाय राहणार नाही.

शिक्षकांनी लिहिलेली आत्मकथने समाजजीवनाला आधार देतात, आकार देतात आणि सुसंस्कृतही करतात. कारण ती चिरंतन जीवनमूल्यांची उपासना असते. स्वत:च्या संसाराबरोबरच ज्ञानसाधना, ज्ञानाध्यापन, ज्ञानप्रसार आणि सांस्कृतिक कार्यातून समाजाचा संसार करणाऱ्या आदर्श शिक्षकाने लिहिलेले आत्मकथन सामाजिकदृष्ट्या अधिक मौलिक असते.

डॉ. रा. गो. प्रभुणे यांच्यासारखी माणसे तेजाचा ध्यास घेऊन सतत आकाशाकडे झेपावत असतात. हे तेज समाजमनातला दाटलेला अंधार कमी करण्यासाठी हवे असते. अशी आकाशाकडे झेपावणारी माणसेच समाजजीवनाला श्रीमंत बनवीत असतात. तेजाची आणि संस्कृतीची समृद्ध परंपरा असलेल्या मातीतून उगवलेले हे आत्मकथन वाचकांना आकाशभर आनंद देण्यात यशस्वी झाले आहे.

अगदी तरुण वयात स्वत:च स्वत:ला घडविणे खूप अवघड असते.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

डॉ. रामचंद्र प्रभुणे नावाच्या एका तरुणाने आपल्या तरुण वयात सारे पाश, सारे मोह आणि सुखे निर्धाराने बाजूला सारलेली आहेत. पुण्यासारख्या मोठ्या शहरात ज्ञानाचा उपासक बनून, मिळेल ते ज्ञान घेणारे डॉ. प्रभुणे स्वत:ला आकार देण्याच्या व्यापक जाणिवेतून घडलेले आहेत. त्यांच्या जीवनाला आकार देणारी खूप मोठी माणसे त्यांच्या जीवनात आलेली आहेत. यशवंतराव चव्हाण, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, दादासाहेब आळतेकर, बाबूरावजी गोखले, मधुकरराव चौधरी, दत्तो वामन पोतदार, कर्मवीर भाऊराव पाटील, पी. डी. पाटील अशी किती तरी नावे सांगता येतील.

या आत्मकथनातील श्यामची आई हे प्रकरण फार महत्त्वाचे आहे. डॉ. प्रभुणे हे श्यामच्या आईचे भक्त आहेत. त्यांचे हे आत्मकथन म्हणजे वाणी, लेखणी, भक्ती आणि मूल्यविचार यातून चांगला माणूस घडविता येतो, हा प्रामाणिक संदेश देणारी संस्कार गाथा आहे. डॉ. प्रभुणे यांचे चारित्र्य, दातृत्वभावना, कृतज्ञता, प्रेम, निष्ठा, दु:ख पचविण्याची क्षमता, श्रमप्रतिष्ठा, भाषेवरील प्रभुत्व, साधी राहणी, संवेदनक्षम मन, समाजिक बांधिलकी असे विविध पैलू त्यांच्या आत्मकथनाची बलस्थाने आहेत.

वाचकांना समृद्ध करणारे हे आत्मकथन वाङ्मयीन दृष्ट्याही सुंदर झाले आहे. हे आत्मकथन प्रत्येक शिक्षकाने वाचून अनुसरले पाहिजे. मराठीच्या वाचकांनीही स्वत:ला समृद्ध करण्यासाठी हे आत्मकथन पुन:पुन्हा वाचले पाहिजे.

*(प्रकाशक श्री. मुकुंद दत्तात्रय कुलकर्णी, शिक्षण मंडळ, कराड.- पृष्ठे - ३२४, किंमत - ३००)*

**(२) एकदा असं झालं :**

ज्येष्ठ साहित्यिक, कथाकार, कादंबरीकार प्राचार्य रा. रं. बोराडे यांच्या प्रतिभेतून साकारलेल्या अनुभवकथांचं हे पुस्तक. खरं तर प्राचार्य रा. रं.



बोराडे सरांना एक उत्तम आत्मकथन लिहिता आलं असतं; पण आत्मकथन न लिहिता त्यांनी या ग्रंथात अनुभव कथा लिहिल्या आहेत. त्यांचं प्रदीर्घ असं वाङ्मयीन जीवन या छोट्या अनुभवकथांत मावत नाही. त्यांनी आत्मकथा लिहावी अशी त्यांच्या अनेक वाचकांची इच्छा होती. रा. रं. बोराडे यांचं संपूर्ण जीवन ज्यांनी अनुभवलं ते सुद्धा सांगतील, की सरांनी आत्मकथन लिहावं असंच त्यांचं जीवन आहे. तरीही आत्मकथनाचा मोह बाजूला सारून सरांनी या ग्रंथात अतिशय प्रभावी अशा ३२ अनुभवकथा वाचकांच्या समोर ठेवल्या आहेत.

आयुष्यात स्वत:ला जे भावलं, जे पटलं तेच सरांनी मनापासून केलं. तडजोड करणं, मूल्यहीन जगणं त्यांच्या स्वभावात बसत नाही. स्वत:च स्वत:साठी मूल्यं वेचणं हा वेगळा आदर्श सरांनी घालून दिलेला आहे. या मूल्यांचं जतन करताना जीवनात आलेले अनेक संघर्षाचे प्रसंग संयमाने पचवून एका उदात्त भावनेतून हे लेखन झालेलं आहे. अनुभवलेल्या असंख्य घटना, अनुभव सरांच्या जवळ आहेत; पण अगदी मोजक्या अनुभवांना शब्दरूप देताना लेखकानं सांभाळलेलं भान लाख मोलाचं आहे. अनेक प्रकारची माणसं त्यांना भेटली. त्या माणसांचे स्वभाव, वागणं, बोलणं, रंग, गंध, आकार चिंतनाच्या पातळीवर मांडल्यामुळे या पुस्तकातील प्रत्येक अनुभवकथा काळजात घर करून बसते.

ठेवा सुंगधी क्षणांचा, आमदार सौभाग्यवतीची जन्मकथा, अशीही झाडाझडती, गोष्टी : घरातल्या, गावातल्या, बा कविराजा तू नसता तर, जगणे माझे,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

तांडा चाललां, मिटलेल्या गंधखुणा, तुका म्हणे झरा, तो एक दिवस, ते हात आणि हे हात आणि सांगता या अनुभवकथांतून आलेलं वास्तव मनाला थक्क करून सोडतं. एकूण प्राचार्य रा. रं. बोराडे यांच्या कथा, कादबंरी, नाटक या वाङ्मयाप्रमाणेच वाचकांना श्रीमंत करणारं हे अनुभवकथन प्रत्येकाने वाचावं असंच कसदार आहे.

*(एकदा असं झालं. प्रा. रा. रं बोराडे – साकेत प्रकाशन, औरंगाबाद, पृष्ठे - १२८ किंमत -१३०)*

**(३) मी सावित्री जोतीराव :**

सोलापूरच्या कविता मुरूमकर यांचं संवेदनशील मन व्यापक सामाजिक जाणिवांचा जागर करीत आलं आहे. या अगोदर 'तुझीच कविता', 'मी राधा' हे कवितासंग्रह आणि 'भैरवी' ही कादंबरी त्यांच्या प्रतिभेतून साकारली आहे. अभ्यास, वाचन, चिंतन आणि सावित्रीबाई फुले यांच्या तेजस्वी जीवनकार्याचा ध्यास यातून 'मी सावित्री जोतीराव' ही कादंबरी त्यांनी साकारली आहे. महात्मा जोतीराव फुले आणि सावित्रीबाई फुले यांच्या समग्र जीवनकार्याचा वेध घेणारी किती तरी पुस्तकं लिहिली गेली आहेत; पण कविता मुरूमकर या लेखिकेने सावित्री आईच्या आत्मनिवेदनातून ही जिवंत केलेली कादंबरी अतिशय महत्त्वाची ठरते. इतिहासाच्या पार्श्वभूमीवर अनेक घटना, प्रसंग आणि व्यक्तींना सजीव करणाऱ्या या कादंबरीतून सावित्रीबाईंचं व्यक्तिमत्त्व उंचीवर घेऊन जाण्यात लेखिका प्रचंड यशस्वी झाल्या आहेत.




एक मुलगी, बहीण, पत्नी, आई, सून, शिक्षिका, कवयित्री, समाजसेविका अशा विविध रूपांचा सखोल वेध घेताना लेखिकेच्या अंतर्मनातील सारी स्पंदनं उत्कटपणे कादंबरीत सहजपणे उतरली आहेत. सावित्रीबाईंच्या व्यक्तिमत्त्वातील जे पैलू उदा. दूरदृष्टी, वैचारिकता, धैर्य, क्रांतिकारी संघर्ष यातून सावित्रीबाई फुले यांचा समग्र जीवनप्रवास आणि बाईपणाच्या गाभ्यातून उत्कटपणे उभी राहणारी समाजमाता अतिशय ताकदीने वाचकांशी संवाद करते. महात्मा फुले यांचं क्रांतिकारी जीवनकार्य आणि सहजीवनातील भावबंध रेखाटताना लेखिकेच्या सर्जनशीलतेने हे अवघड शिवधनुष्य लीलया पेललं आहे. सावित्रीबाई फुले यांच्यातल्या युगप्रवर्तक स्त्रीला कादंबरीतून समाजापुढे ठेवण्याचा प्रयत्न खरोखरीच अतिशय प्रभावीपणे झाला आहे. सावित्री आईच्या स्त्रीत्वाचा प्रवास, माणुसकी आणि श्रम या मूल्याकडे कसा वळला हे मांडतानाच क्रांतीचा समृद्ध इतिहास दर्शवणारी समृद्ध शौर्यगाथा मांडण्याचा लेखिकेचा प्रयत्न महत्त्वाचा वाटतो. प्रचंड क्रियाशीलता, उत्तम व्यवस्थापन आणि कुशल विचारशीलता यातूनच सावित्रीबाई फुले यांच्या तेजस्वी जीवनाची सार्थकता वाचकांना समजू शकेल. हेच या कादंबरीचं यश आणि बलस्थान आहे.

*(कविता मुरूमकर – प्रकाशक – शौर्य प्रकाशन, पृष्ठे - २९४, किंमत - ४५०)*

**(४) आणि चिनार लाल झाला :**

प्रभाकर पेंढाकर यांची ही अप्रतिम कादंबरी वाचकाला एका वेगळ्या विश्वात घेऊन जाते. काश्मीरसारखा अतिशय सुंदर आणि निसर्गरम्य प्रदेश जेव्हा युद्धाच्या गडद काळ्याकुट्ट छायेत सापडतो तेव्हा तिथल्या माणसांची मनंही काळवंडून जातात. प्रभाकर पेंढारकरांनी काश्मीरच्या दोन महिन्यांच्या वास्तव्यांत अनुभवलेला जीवनसंघर्ष या कादंबरीच्या रूपाने प्रभाविपणे मांडला आहे. लेखक आपल्या अनुभवातून काश्मीरमधल्या जीवघेण्या संघर्षाची गाथा प्रभावीपणे कादंबरीत मांडतात. युद्धाच्या पार्श्वभूमीवर



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



लिहिलेल्या कथा, कादंबऱ्या या भूदलाच्या कामगिरीवर आधारित आहेत. पण पेंढारकरांची ही कादंबरी हवाईदलाच्या कर्तृत्वावर आधारलेली आहे. विमान चालकाचे कौशल्यं, शत्रूच्या विमानावर प्रतिहल्ला करण्यासाठी केलेल्या कसरती, वैमानिकाचे धाडस, मन:स्थिती, चपळाई याचे अचूक आणि विलोभनीय वर्णन वाचताना वाचक प्रत्यक्ष युद्धाचा अनुभव घेत असतो. वाचक इतका त्यांत रमतो, की श्री. पेंढारकर हेच जणू प्रत्यक्षात हवाईदलात काम करतात असे वाटत राहते. जवळ जवळ ४० वर्षांचा कालखंड या कादंबरीत आढळतो. पण लेखकाने वर्णन केलेली काश्मीरमधील वास्तवता यात आजही काही फरक झालेला नाही. या कादंबरीचा ताजेपणा एवढा आहे, की ही कादंबरी कालपरवाच लिहिली आहे असे वाटत राहते. प्रभाकर पेंढारकरांच्या या कादंबरीचा नायकही पाकिस्तानी हवाई दलाचा एक फायटर पायलट आहे. कादंबरीची कथा प्रेमकथा असली तरी वाचकांना विचारप्रवर्तक आणि दिशादर्शक ठरेल अशीच ही कादंबरी आहे.

**(५) प्रतीक्षा :**

प्रभाकर पेंढारकरांची प्रतीक्षा ही दुसरी कादंबरीही अतिशय आगळी वेगळी युद्धकथाच आहे. लेखकाने तटस्थपणे आपले अनुभवविश्व मांडताना ते या पार्श्वभूमीचा अविभाज्य घटक बनले आहेत. पेंढारकरांनी ही कादंबरी नेमक्या आणि नेटक्या शब्दांत प्रभावीपणे मांडताना आपल्या वैशिष्ट्यपूर्ण ओघवत्या शैलीचा वापर करून वाचकांना खिळवून ठेवण्याचे कसब साधले आहे. जिवंत विषय आणि प्रभावी लेखणी यामुळे ३० वर्षापूर्वीची ही कादंबरी वाचकांना आजचीच वाटते. हे अगदी निर्विवाद.



पॅराशूट ट्रेनिंग कॅम्पच्या निमित्त लेखक स्वत: भारतीय सैनिकांबरोबर दोन महिने राहिले. या काळात सैनिकी जीवनाचा जवळून अनुभव घेतला. सैनिकातल्या संवेदनशील मनाचा तळ अभ्यासला. समाज आणि सैनिक यांच्यातल्या अंतराचा सूक्ष्म शोध हेच या कादंबरीचे वैशिष्ट्य आहे. समाजमनातून हद्दपार झालेली मूल्ये आणि तडा गेलेल्या श्रद्धा यामुळे सीमेवर लढणारा सैनिकही अस्वस्थ होतो. युद्धाच्या कथा रम्य असल्या तरी प्रत्येक युद्ध म्हणजे एक शोकांतिकाच असते. राष्ट्र कोणतेही असो जय आणि पराजयाचे परिणाम त्यांना भोगावेच लागतात. प्रस्तुत कादंबरीचा नायक या जाणिवेतून समाजापुढे युद्धाचे विशाल चित्र उभे करतो. माणूसपणाची जाणीव आणि माणूसपणाचा शोध यातूनच ही कादंबरी वाचकांना अस्वस्थ करते. वाचकांना अस्वस्थ करण्याचे सामर्थ्य या कादंबरीत आहे. हेच लेखकाचे खरे यश आहे.

*(लेखक प्रभाकर पेंढारकर. दोन्ही कादंबऱ्या प्रकाश राजेंद्र प्रकाशन, मुंबई)*



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

### (६) ज्योती :

लेखिका अलका मोहोळकर यांच्या प्रतिभेतून साकारलेल्या १७ कथांचा हा संग्रह वाचनीय झाला आहे. कथा, कविता, बालकथा, ललित अशा विविध प्रकारचे त्यांचे लेखन प्रकाशित झालेले आहे. 'ज्योती' या कथा संग्रहातल्या कथा अत्यंत वेगळ्या आहेत. उत्कृष्ट भावदर्शन आणि विषयांतली विविधता यामुळे वाचक कथांशी एकरूप होऊन जातो. साने गुरुजींच्या 'आंतरभारती' या व्यापक विचारातून झालेले मूल्यसंस्कार कथांतून वाचकांवरही मूल्य संस्कार करतात. स्त्रियांचे सामाजिक जीवन आणि त्यांची होणारी घुमसट हा लेखिकेच्या चिंतनाचा विषय आहे. तसाच शेतकऱ्यांचे प्रश्न आणि शेतकऱ्यांची दयनीयता पाहून त्यांनी 'शाप'सारखी साकारलेली कथा शेतकऱ्यांच्या आशा-आकांक्षा समृद्धपणे चित्रित करते. उपेक्षित मुलींच्या शिक्षणाचा प्रश्न आणि उच्च शिक्षणासाठी तिची होणारी कोंडी हासुद्धा लेखिकेने कथेत प्रभावीपणे मांडलेला वेगळा विषय आहे. बालकामगारांच्या व्यथा,




वांझ स्त्रीचे दु:ख, सामुदायिक विवाह, घरातले नातेसंबंध, कौटुंबिक घुसमट, इतर धर्मांचा आदर, सहिष्णुता अशा वैचारिक सूत्रांना कथेत मांडताना लेखिका सामाजिक जाणिवा समृद्ध करतात यात शंका नाही. एकूणच कथासंग्रह वाचावा असाच आहे.

*(ले. प्रकाशिका अलका मोहोळकर – पृष्ठे - १४८, किंमत - ११०)*

### (७) भुईशास्त्र :



मु. पो. काकासाहेब नगर ता. निफाड, जि. नाशिक इथला हा कवी. आजच्या तरुण पिढीत कसदार कवितांचं लेखन करतो आहे. ऐश्वर्य पाटेकर हे त्यांचं नाव. छोट्या छोट्या गावांतून समृद्ध जाणिवांचे आकाश पेलणारे मोजके कवी भेटतात. त्यांत ऐश्वर्य पाटेकरांचं नाव आवर्जून घ्यावं लागेल. मी अनेक वेळा या कवीच्या काही कविता विविध संमेलनांतून ऐकल्या होत्या. 'भुईशास्त्र' या त्यांच्या पहिल्याच कवितासंग्रहात त्यांच्या सर्व कविता वाचताना मी नुसता भारावून गेलो नाही, तर आतून प्रभावित झालो. ग्रामीण भागातील माणसांची वेदना अचूकपणे या संग्रहात पकडली आहे. कवी घडवता येत नाही, बनवता येत नाही, तो मातीतून हिरवागार होऊन उगवावा लागतो. ऐश्वर्य पाटेकर हे नाव मराठी कवितेत उगवलेला कवी म्हणूनच नोंदवावं लागेल. त्यांचं 'भुईशास्त्र' वाचताना वाचकांना याचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही. किती अंगानी, किती अनुभवांतून, किती जाणिवांतून कवीचं हृदय कवितामय झालेलं आहे, याचा अनुभव 'भुईशास्त्र' वाचल्यावरच वाचक घेऊ शकतात.

'भुईशास्त्र'तील सर्व कविता आतल्या वेदनेमुळे सुंदर झाल्या आहेत. कवीचं भान, कवीचं ज्ञान, कवीचं जगणं, कवीचं भोगणं आणि कवीचं शब्दांत उतरणं इतक्या ताकदीनं कवितेत उतरल्याची उदाहरणं फारच कमी आहेत. दृष्टांतपाढे, हुर्दुकाठीचा, गर्भओवी, भुईशास्त्र, वृषभलीला अशा पद्धतीने कवितांची विभागणी



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

असली तरी कवितेच्या आतला हुंदका मात्र एकच आहे. कविता हा समृद्ध जाणीवांचा हुंदका वाचकांना आतून अस्वस्थ करतो, समाजाला काही प्रश्न विचारतो. पण या प्रश्नांची उत्तरं समाजाकडे आहेत का? ऐश्वर्य पाटेकरांची ही प्रामाणिक कविता मराठी कवितेला पुढं घेऊन जाते आहे. शेतकऱ्यांच्या, मजुरांच्या, वेदना मांडतांना शब्दातले असूड सर्वव्यापीपणामुळे संयमात रूपांतरित होतात. हीच त्यांच्या कवितेची ताकद आहे. स्वत:ची वेगळी वाट या कवीने निर्माण केली आहे. कवितेच्या परंपरेचा आदर तर आहेच, पण अभिव्यक्तीचं आत्मभानही आहे. आत्मसंवाद हा तर या कवितांचा उठून दिसणारा कवितालंकार आहे. आजच्या नव्या कवितेत अनेक 'बोल्ड' आणि 'सोल्ड' कवी भेटतात आणि जातात. या पार्श्वभूमीवर ऐश्वर्य पाटेकरांची कविता हृदयात खोलवर सात्त्विकतेचं हळवं घर करून बसते. हीच त्यांच्या कसदार कवितांची पावती आहे. जाणकार वाचक आणि समीक्षकही या कवितांनी अस्वस्थ होतील.

*(कवी ऐश्वर्य पाटेकर, प्रकाशक : शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे - ११२, किंमत - १२०)*

**(८) अज्ञाताच्या वाटेवर :**

प्रा. शरद उमराणी यांच्या 'माळ' या कवितासंग्रहानंतर 'अज्ञाताच्या वाटेवर' हा कवितासंग्रह रसिकांसमोर आला आहे. विविध विषयांची कवितेत मांडणी करताना कवीने या संग्रहात ६० कविता वाचकांसाठी दिल्या आहेत. केशवसुत म्हणतात, "कवितेची वाट सोपी नाही. ती खूप अवघड आहे." या अवघड वाटेवर प्रा. शरद उमराणी यांची कविता मात्र आशय, आकृतिबंध, जाणिवा आणि विषयांमुळे नैसर्गिक हिरवळ घेऊन वाचकांसमोर येते. सु. रा. चुनेकर या कवितांविषयी लिहितात, "कवितेच्या सहवासात दीर्घकाळ राहूनही कविता म्हणजे काय? हे समजत नाही" पण प्रा. शरद उमराणी यांची या



संग्रहातली कविता याला अपवाद आहे. शरद उमराणी यांच्या कवितेला एक स्वत:ची मुद्रा आहे. त्यामुळे ही कविता उमराणी यांची आहे हे लगेच ध्यानात येते. आंतरऊर्मीतून आलेली कोणतीही कविता जुनी किंवा नवी असत नाही. ती फक्त कविता असते. अनुकरणापासून दूर असलेली उमराणी यांची प्रगल्भ कविता अज्ञाताच्या वाटेवरून माणसाचा शोध घेत चालली आहे. अशा अज्ञाताच्या वाटा जेव्हा जगण्याचा अन्वयार्थ शोधतात तेव्हा या वाटा काळजात घर करून बसतात. यासाठी कवीने जीवनातल्या अनेक अनुभवांना शब्दात बांधताना सांभाळलेला तोल फार महत्त्वाचा आहे. निसर्गाबद्दलचं प्रेम, माणसाबद्दलची आपुलकी, उत्कट संवेदना आणि भोवतालच्या समाजाकडे पाहण्याची दृष्टी यामुळे या संग्रहातील कविता वाचनीय झालेल्या आहेत.

*(कवी प्रा. शरद उमराणी, प्रकाशक : चंद्रकला प्रकाशन, पुणे. पृष्ठे - ८८, किंमत - ८०)*

**(९) पारध आणि आयुध :**

डॉ. रत्नाकर भेलककर यांचा 'कंप आणि प्राणधून' हा पहिला कवितासंग्रह. त्यानंतर प्रदीर्घ कालावधीनंतर त्यांचा 'पारध आणि आयुध' हा कवितासंग्रह वाचकांसमोर आला आहे. कथा, अनुवाद, समीक्षा,



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



ललित अशा प्रकारचं लेखन त्यांनी केलेलं आहे. सातत्याने ते वाङ्मय व्यवहाराशी अनुबंधित आहेत. १९९१ नंतरच्या दशकातील कविता 'पारध आणि आयुधे' या संग्रहात समाविष्ट आहे. डॉ. उषा देशमुख यांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना या संग्रहाला लाभली आहे.

संघर्ष आणि समर्पण यातलं द्वंद्व हाच कवीच्या साहित्यनिर्मितीचा आत्मा आहे. मूल्यव्यवस्था आणि आजच्या युगाचे प्रश्न अनेक अंगांनी त्यांच्या कवितेत आलेले आहेत. कवीची विचारधारा आशावादी आहे. उत्कटता, कल्पकता आणि वैचारिकता यामुळे ही कविता आतूनच प्रवाही झालेली आहे. समकालीन वास्तवाचं भान जपणारी भालेकरांची कविता आजच्या चंगळवादी दुनियेला काही सावधानतेचे इशारे देते. जागतिकीकरणात भरडलं जाणारं माणूसपण हा कवीच्या चिंतनाच्या विषय आहे. मातृभाषाप्रेम, संस्कृतिप्रेम, राष्ट्रप्रेम या बद्दलच्या अनास्थेमुळे कवी अस्वस्थ होतो. यातूनच अनुभवांना समृद्ध आशयाची श्रीमंती देण्यात कवी यशस्वी झाला आहे.

*(कवी – डॉ. रत्नाकर भेलकर – प्रकाशक – स्नेहवर्धन पब्लिशिंग हाऊस, पुणे. पृष्ठे - ८४, किंमत - ८०)*

◇◇◇

**ग्रंथ परीक्षण : उद्धव कानडे**
६८६/२३१/२ब, ब्लॉक नं. १५
ज्ञानगंगा गृहरचना संस्था मर्या.
बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७
मो. ९८९०६५२७२३

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे प्रकाशन

**भाषा व साहित्य : संशोधन**

संपादक : **डॉ. वसंत स. जोशी**

मराठी भाषेच्या संशोधक – विद्यार्थ्यांना भाषा आणि साहित्यातील संशोधनाची दिशा आणि पद्धती सांगणारा ग्रंथ महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुनर्मुद्रित केला आहे. यात मराठीतील तीस अधिकारी व्यक्तींचे विविध विषयांवरील अभ्यासू लेख संपादित केले आहेत.

**प्रथम आवृत्ती : १९८१. भाग १ ला सुधारित दुसरी आवृत्ती : २००६ मध्ये प्रसिद्ध झाली.**
**पृष्ठे : ४५० (डेमी) मूल्य रु. ५००/-, भाग २ रा मूल्य रु. ३००/-, भाग ३ रा मूल्य रु. २००/-**

: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद,**

टिळक रस्ता, पुणे – ४११ ०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



## महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
(१ सप्टेंबर २०११ ते २० नोव्हेंबर २०११)

### — पुणे शहर —

**१) दि. ४ ऑक्टोबर २०११ : ग्रंथालय विभाग : सरस्वती पूजन :** मसाप ग्रंथालयात कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते सरस्वती पूजन करण्यात आले. या वेळी कोशाध्यक्ष सुनील महाजन, ग्रंथालय विभाग प्रमुख महेंद्र मुंजाळ, कार्यवाह प्रकाश पायगुडे, कार्यकारिणी सदस्य श्याम जोशी, लेखक श्याम भुर्के, निकिता मोघे, ग्रंथालय व कार्यालयातील सेवक वर्ग आणि काही वाचक उपस्थित होते.

**२) दि. ७ ऑक्टोबर २०११ : कै. द. वा. पोतदार स्मृती पुरस्कार :** डॉ. अनुराधा कुलकर्णी यांच्या 'शिवछत्रपतींची पत्रे खंड १' या पुस्तकाला इतिहासाचे ज्येष्ठ अभ्यासक डॉ. सदाशिवराव शिवदे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. या वेळी परिषदेच्या विश्वस्त मंडळाचे सदस्य माननीय आमदार उल्हासदादा पवार हे अध्यक्षस्थानी होते. कै. पोतदारांच्या स्नुषा शुभलक्ष्मी पोतदार व प्रमुख पाहुणे सदाशिवराव शिवदे यांचा आमदार उल्हासदादा पवार यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. तसेच अध्यक्ष मा. उल्हासदादा पवार यांचा सत्कार परिषदेचे कोशाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते करण्यात आला. तसेच डॉ. सुमित्रा कुलकर्णी व श्री. पांडुरंग बलकवडे या परीक्षकांचा सत्कार कोशाध्यक्ष सुनील महाजन यांनी केला. तसेच त्यांनी उपस्थितांचे स्वागत केले व कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले. श्री. पांडुरंग बलकवडे यांनी परीक्षकांतर्फे मनोगत प्रकट केले. लेखिका डॉ. अनुराधा कुलकर्णी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. प्रमुख पाहुणे डॉ. शिवदे यांनी भाषण केले व आमदार पवार यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले व नंदा सुर्वे यांनी आभार प्रदर्शन केले.

**३) दि. २१ ऑक्टोबर २०११ : 'संवेदना' दिवाळी अंक प्रकाशन समारंभ :** मसापचा स्वत:चा पहिलावहिला दिवाळी अंक यंदा मोठ्या दिमाखात प्रसिद्ध झाला. या दिवशी मसापचा परिसर पणत्या, रांगोळ्या अशा रोषणाईने सजवला होता. समारंभाचा प्रारंभ श्री. पाचंगे यांच्या चौघडा वादनाने झाला. परिषदेच्या १०५ वर्षांच्या इतिहासात परिषदेचा स्वत:चा 'संवेदना' हा दिवाळी अंक साहित्यिक डॉ. अनिल अवचट यांच्या हस्ते प्रकाशित झाला. या वेळी परिषदेचे अध्यक्ष व समारंभाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार हे उपस्थित होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. कोशाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन डॉ. अनिल अवचट व द.मा.मिरासदार यांचे डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत केले. संवेदना' दिवाळी-२०११चे प्रकाशक या नात्याने प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी आपले मनोगत व्यक्त केले. त्यानंतर 'संवेदना'चे संपादक डॉ. नीलिमा गुंडी व मनोहर सोनवणे या दोघांनी मनोगते व्यक्त केली. डॉ. अनिल अवचट यांच्या हस्ते 'संवेदना' दिवाळी अंक-२०११चे प्रकाशन झाले. याच वेळी हा अंक परिषदेच्या वेबसाइटवर सुद्धा दिसू लागला. त्यामुळे हा अंक जगभर दिसणार आहे. धनंजय दातार आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी ही वेबसाइट सुरू करून देण्यासाठीचे परिश्रम घेतले. यानंतर दिवाळी अंकातील लेखक व सहकार्य



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

करणाऱ्यांचे प्रातिनिधिक सत्कार करण्यात आले. त्यात डॉ. नीलिमा गुंडी, मनोहर सोनवणे, प्रशांत खुंटे, अंजली कुलकणी, धनंजय दातार, अंजली रानडे, रोहिणी दातार, प्रदीप खेतमर, रेश्मा बर्वे, अशोक देव, मुमताज पिरभॉय, मेधा कुलकर्णी, मृणालिनी जोशी, विद्या पटवर्धन, विवेक सबनीस, मुक्ता बाम, इरा जोशी, मंगला गोडबोले, प्रा. के. रं. शिरवाडकर, दत्तोबा पाचंगे व त्यांचा नातू, ज्योत्स्ना नांदर्गीकर, अशोकराव डहाळे, महेंद्र मुंजाळ, चंद्रशेखर केळकर, राजेंद्र तुपे, संदीप खाडे, म. श्री. दीक्षित, डॉ. शेजवलकर, उज्ज्वला जोगळेकर यांचा सत्कार करण्यात आला. डॉ. अनिल अवचट यांनी आपले विचार प्रकट केले. समारंभाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांनी अध्यक्षीय समारोप केला. सूत्रसंचालन उद्धव कानडे यांनी केले व कोशाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले.

**४) दि. १ नोव्हेंबर २०११ : थोर लेखिका कै. योगिनी जोगळेकर स्मृतिदिनानिमित्त कविसंमेलन :** योगिनी जोगळेकर यांच्या साहित्य संपदेबद्दल कार्यवाह दीपक करंदीकर यांनी माहिती दिली. स्वत: योगिनीताईंनी स्वरलेले व संगीतबद्ध केलेले 'शारदास्तवन' प्रारंभी सौ. संगीता सोनही व ऊर्मिला भांबुरकर यांनी सादर केले. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी प्रास्ताविक केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी स्वागत केले. अध्यक्ष कवी रमण रणदिवे यांचे पुष्पगुच्छ देऊन प्रा. मिलिंद जोशी यांनी स्वागत केले. तसेच सर्व निमंत्रित कवी/कवयित्रींचे डॉ. माधवी वैद्य यांनी गुलाबफूल देऊन स्वागत केले. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी अध्यक्ष रमण रणादिवे यांचा परिचय करून दिला. यानंतर निमंत्रितांचे कविसंमेलन झाले. त्यात आश्लेषा महाजन, दीपक करंदीकर, उद्धव कानडे, ज्योत्स्ना चांदगुडे, विवेक सबनीस, स्वाती सामक, मीरा शिंदे, मिलिंद जोगळेकर व मनोहर सोनवणे यांनी आपल्या कविता सादर केल्या. प्रारंभी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी योगिनीताईंच्या स्मृतिप्रीत्यर्थ स्वरचित एक कविता सादर केली. या रंगलेल्या कविसंमेलनाचे सूत्रसंचालन मनोहर सोनवणे यांनी केले. त्यानंतर कै. योगिनी जोगळेकर यांच्या संस्मरणीय आठवणींचे कथन सौ. संगीता सोहनी व ऊर्मिला भांबुरकर यांनी केले. कवी रमण रणदिवे यांनी अध्यक्षीय समारोप केला व आपल्या काही काव्यरचना सादर केल्या. सूत्रसंचालन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले व डॉ. माधवी वैद्य यांनी आभार मानले. अनेक मान्यवर व कै. योगिनी जोगळेकर यांच्या कुटुंबीयांपैकी श्री. सुधन्वा जोगळेकर हेसुद्धा खास उपस्थित होते.

**५) दि. १४ नोव्हेंबर २०११ : प.पू. परमहंस स्वामी स्वरूपानंद (पावस) स्मृतिदिन व्याख्यान :** पुणे विद्यापीठातील ज्ञानेश्वर अध्यासनाचे विभागप्रमुख डॉ. यशवंत पाठक यांचे 'अद्वैत दर्शनात नाथ संप्रदायाची केंद्रीय भूमिका' या विषयावर निरुपण आयोजित केले होते. कार्यक्रमाचे प्रास्ताविक व उपस्थितांचे स्वागत कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. त्याचप्रमाणे वक्ते डॉ. यशवंतराव पाठक यांचा पुष्पगुच्छ, श्रीफल व शाल देऊन डॉ. माधवी वैद्य यांनी सत्कार केला. मा. श्री. वसंतराव देसाई यांच्या हस्ते वक्ते डॉ. यशवंत पाठक यांचा स्वरूप ज्ञानेश्वरी हा ग्रंथ, श्रीफल, शाल व स्वामी प्रसाद अशा भेटवस्तू देऊन सत्कार करण्यात आला. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी डॉ. यशवंत पाठक यांचा परिचय करून दिला. यानंतर डॉ. यशवंत पाठक यांनी 'अद्वैत दर्शनात नाथ संप्रदायाची केंद्रीय भूमिका' या विषयावर निरुपण केले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले व आभार मानले.

**६) दि. १९ नोव्हेंबर २०११ : प्रथम उर्दू-मराठी महिला साहित्य संमेलन :** उर्दू साहित्य परिषद, पुणे व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने पहिले उर्दू-मराठी महिला साहित्य



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद



संमेलन पुण्यातील आझम कॅम्पसच्या भव्य सभागृहात दिवसभरासाठी आयोजित केले होते. संमेलनाच्या उद्घाटन सत्रात मुमताज परिभॉय या उर्दू महिला साहित्यिक अध्यक्षपदी होत्या. उद्घाटक म्हणून प्रसिद्ध मराठी कवयित्री सौ. आसावरी काकडे उपस्थित होत्या. आबेदा इनामदार यांनी स्वागत केले. प्रमुख अतिथी म्हणून डॉ. माधवी वैद्य, मुनव्वर परिभॉय, प्रा. मिलिंद जोशी, काजी मुश्ताक अहमद, आरिफ बागवान, श्रीकांत पाटील, योगेंद्र माने आदी उपस्थित होते. त्यानंतर पहिल्या सत्रात डॉ. माधवी वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली 'भारतीय भाषांचे भवितव्य' या विषयावर परिसंवाद झाला. डॉ. नीलिमा गुंडी, रफ़िया शबनम आबिदी यांनी परिसंवादात भाग घेतला. दुसऱ्या सत्रात वृंदा दिवाण यांच्या अध्यक्षतेखाली कथाकथन झाले. त्यात शुभदा केसकर, भारती पांडे, सादिका नवाब सहर, शमशाद ताकीदार, नसरीन सय्यद आदींनी कथाकथन केले. तिसऱ्या सत्रात मुमताज परिभॉय यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. सलीम मुहियुद्दीन मुख्य अतिथी होते. शमीम अब्बास, सिकंदर मिर्झा, दीपक करंदीकर, मनोहर सोनवणे, मधुसूदन घाणेकर, अंजली कुलकर्णी, आश्लेषा महाजन, मृणालिनी कानिटकर, सफ़िया अंकोलवी, कमर सुरुर, नग़्मा जावेद, अपर्णा कडसकर, शमशाद शाद, सुमिता केशव आदींनी काव्यवाचन केले. शेवटी रफ़ीक शबनम अविदी, डॉ. माधवी वैद्य, सुरैया सौलत हुसेन, सादिक नवाब सहर, अंजली कुलकर्णी, शकिला सय्यद, मृणालिनी कानिटकर यांना विविध अॅवॉर्ड्स देऊन सन्मानित करण्यात आले.

◇◇◇

**कार्यवृत्त नोंद : दीपक करंदीकर**
स्थानिक कार्यवाह मसाप, पुणे.

## – जळगाव शाखा –

**दि. १०-८-२०११** ला महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जळगावने कवीश्रेष्ठ डी. बी. जगत्पुरिया यांच्या अध्यक्षतेखाली महात्मा गांधी वाचनालय, जळगाव येथे कविसंमेलन आयोजित केले होते.

प्रास्ताविक आणि सूत्रसंचालन कार्याध्यक्ष, प्रा. रितेश पाटील यांनी केले.

आभार आणि कवींचे स्वागत भास्कर चव्हाण यांनी केले.

उपस्थित कवींनी 'वरसत श्रावणधारा' या विषयावर माजी जिल्हा म.सा.प. अध्यक्ष, साहित्यिक नारायण शिरसाळे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ कविता सादर केल्या.

अध्यक्ष जगत्पुरिया यांनी कवी संमेलनाचा समारोप करताना म्हटले, की 'शृंगार फुलवत भावना चाळवणारी कविता निसर्ग कविता नसते.' त्यांनी 'वनराईच्या ओठावरनं ऐन श्रावण' ही कविता म्हटली.

या कविसंमेलनात कवी भगवान भटकर, प्रा. डॉ. शकुंतला चव्हाण, सुरेश चौधरी, प्रकाशचंद्र तेलंग, प्रा. दिनेश पाटील, भास्कर चव्हाण, रत्नाकर कोळी, प्राचार्य भगवान नवरे यांनी भाग घेतला.

प्रा. डॉ. मिलिंद बागुल, सौरभ कुलकर्णी, अभिजित कुलकर्णी, दगडू चौधरी, अशोक भगत हजर होते.

**कार्याध्यक्ष प्रा. दिनेश पाटील**
म.सा.प., जळगाव



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## – पिंपरी-चिंचवड शाखा –

**दि. २८/८/२०११ रोजी** उषाकुमारी यांच्या गझल गायनाचा कार्यक्रम. स्थळ – चैतन्य सभागृह, चिंचवड.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे व महाराष्ट्र वृत्तपत्र लेखक असोसिएशन यांच्या वतीने गझलकार डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी यांच्या स्मृतिनिमित्त 'उषाकुमारी' यांचा गझल गायनाचा कार्यक्रम दिनांक २८ ऑगस्ट २०११ रोजी आयोजित करण्यात आला होता.

ज्येष्ठ सामाजिक कार्यकर्ते कांतिलाल खिंवसरा यांच्या हस्ते उद्घाटन झाले. प्रास्ताविक राजन लाखे यांनी केले. मसापचे कार्यवाह प्रकाश पायगुडे, चिंचवड रोटरी क्लबचे अध्यक्ष विजय देसाई, उद्योजक ओमप्रकाश पेठे, संजय खानोलकर, सुभाष गावडे, अपर्णा मोहिले, नाना दामले यांची प्रमुख उपस्थिती होती. अंजली गोसावी ऊर्फ 'उषाकुमारी' यांनी स्वरचित गझलांनी रसिकांना मंत्रमुग्ध केले.

उषाकुमारी यांना केदार कुलकर्णी (तबला) व हेरंब चिंचणीकर (हार्मोनिअम) यांनी साथसंगत केली. चंद्रकांत धस व किरण लाखे यांनी सूत्रसंचालन केले. प्रकाश पायगुडे यांनी डॉ. सुरेशचंद्र नाडकर्णी यांच्या हृद्य आठवणी सांगितल्या. खिंवसरा यांनी कार्यक्रमाला शुभेच्छा देताना गझलांचे रसिकांच्या हृदयातले स्थान जागवले.

सुहास पोकळे, नितीन यादव, माधुरी ओक यांनी संयोजन केले.

**दि. २०/०९/२०११ :** निमंत्रितांचे कवी-संमेलन आणि व्याख्यान - जगण्यात मजा आहे. प्रा. मिलिंद जोशी

महाराष्ट्र साहित्य परिषदेने रविवार दि. २९ मे २०११ रोजी सकाळी चिंचवड येथे निमंत्रितांचे कवी संमेलन व प्रा. मिलिंद जोशी यांच्या 'जगण्यात मजा आहे.' व्याख्यानाचे आयोजन मसापचे पिं.चिं. प्रतिनिधी राजन लाखे व डॉ. पुरुषोत्तम काळे यांनी महाराष्ट्र वृत्तपत्र लेखक असोसिएशन व मधुश्री कला आविष्कार यांच्या सहकार्याने केले. कार्यक्रमाला प्रमुख पाहुणे म्हणून श्री. भाऊसाहेब भोईर उपस्थित होते. अध्यक्षस्थानी डॉ. माधवी वैद्य होत्या.

कार्यक्रमाची सुरुवात दीपप्रज्ज्वलनाने झाली. मसाप, पुणेच्या नवनिर्वाचित उपस्थित सदस्यांचा सत्कार महाराष्ट्र वृत्तपत्र लेखक असो. व मधुश्री कला आविष्कार यांच्यातर्फे सन्मानचिन्ह देऊन करण्यात आला. श्री. भाऊसाहेब भोईर यांनी मसापला सर्वतोपरी मदत करण्याची ग्वाही दिली. तसेच साहित्य संमेलन पिंपरी-चिंचवड येथे आयोजित करण्याची इच्छा प्रकट केली. डॉ. माधवी वैद्य यांनी पिंपरी-चिंचवडमधील सर्व मसाप सदस्यांचे आभार मानले. तसेच पिंपरी-चिंचवडमध्ये वेगवेगळे साहित्यिक उपक्रम सुरू करण्यास नवनवीन कल्पना राबवून मसाप पिं.चिं.मध्ये नव्या रूपात फोफावण्याची इच्छा प्रकट करून त्यासाठी स्वत: जातीने लक्ष घालीन, असे सांगितले.

त्यानंतर खरोखरच जगण्यात मजा यावी असे बहारदार, उद्बोधक व्याख्यान प्रा. मिलिंद जोशी यांचे झाले. त्यानंतर कवी संमेलनाला सुरुवात झाली. २५ कवींनी आपल्या वेगवेगळ्या कविता सादर केल्या. राजेंद्र पोकळे यांनी त्यांना जगदीश खेबुडकरांनी स्वत: लिहून दिलेली आशीर्वादाची कविता ऐकवून कवी संमेलनाला सुरुवात झाली. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन कवयित्री मीना शिंदे यांनी केले.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक राजन लाखे यांनी केले. सूत्रसंचालन किरण लाखे व आभार प्रदर्शन माधुरी ओक यांनी केले. संयोजनासाठी सर्वांनी साथ दिली.

**राजन लाखे**



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## — बार्शी, जिल्हा-सोलापूर शाखा —

बार्शी शाखेची सर्वसाधारण सभा नुकतीच आयोजित करण्यात आली. सभेत कार्यकारी मंडळाची निवड होऊन पुढीलप्रमाणे नवीन कार्यकारिणी जाहीर करण्यात आली.

अध्यक्ष - पां. न. निपाणीकर, उपाध्यक्ष - ॲड. प्रशांत शेटे, कार्याध्यक्ष - मुकुंदराज प. कुलकर्णी, प्रमुख कार्यवाह - शब्बीर मुलाणी, सहकार्यवाह - प्रा. डॉ. दीपा सावळे, कोशाध्यक्ष - मुकुंद कुलकर्णी (निरमावाले), सदस्य - डॉ. प्रशांत मोहिरे, प्रा. डॉ. वि. रा. पारसे, प्रा.चंद्रहंस गंभीर, श्री. जयसिंह चंपेले, श्री. सुभाष जगदाळे, श्री. प्रकाश गव्हाणे, अनुराधा केसकर, सौ. सुमन चंद्रशेखर, सौ. सत्यभामा जाधवर

निर्वाचन अधिकारी म्हणून सोलापूर जिल्हा प्रतिनिधी पद्माकर कुलकर्णी यांनी काम पाहिले.

**१० सप्टेंबर २०११ रोजी** महाराष्ट्र साहित्य परिषद, बार्शी शाखा कार्यकारिणीची प्रथम सभा श्री. पां. न. निपाणीकर यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाली. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या घटनेप्रमाणे केंद्र नियुक्त प्रतिनिधी म्हणून श्री. दत्ता गोसावी यांचे नाव जिल्हा प्रतिनिधी श्री. पद्माकर कुलकर्णी यांनी सुचविले आणि स्थानिक स्वीकृत सदस्य म्हणून प्रा. चंद्रशेखर कोरे आणि शारदा पानगावकर यांची नियुक्ती करण्यात आली.

**शब्बीर मुलाणी**
प्रमुख कार्यवाह म.सा.प., बार्शी

---

## — वारजे-कोथरूड शाखा —

**शुक्रवार, दि. १२/८/२०११ रोजी** वारजे येथील ए-वेदगंगा सोसा. सभागृहात सायंकाळी प्रथितयश कवींचे संमेलन झाले. श्री. शंतनु चिंधडे, श्री. मनोहर सोनावणे व डॉ. अश्विनी धोंगडे यांनी आपल्या कविता सादर केल्या. **दि. २४/९/२०११ रोजी** शाखेतर्फे हॅपी कॉलनी, कोथरूडच्या सभागृहात डॉ. अलका न्यास यांचे 'महाभारतातील स्त्रिया' या विषयावर विचारप्रवर्तक व्याख्यान झाले. डॉ. अश्विनी धोंगडे या कार्यक्रमाच्या अध्यक्षा होत्या. कार्यक्रमाचे आभार प्रदर्शन शाखेचे प्रमुख कार्यवाह श्री. गोपाळराव कुलकर्णी यांनी केले. **रविवार, दि. १३/११/२०११ रोजी** शाखेतर्फे कर्वेनगर येथील म. कर्वे स्त्री शिक्षण संस्थेच्या इचलकरंजी हॉलमध्ये लेखक-वाचक मेळावा मोठ्या उत्साहात झाला. प्रारंभी शाखेच्या अध्यक्षा डॉ. अश्विनी धोंगडे यांनी सर्वांचे स्वागत केले. त्यांनी मेळाव्यामागची भूमिका व आगामी संकल्प याची माहिती दिली. दीपप्रज्ज्वलनाने उद्घाटन झाले.

या मेळाव्याचे अध्यक्ष श्री. ह. मो. मराठे, तर डॉ. अरुणा ढेरे या प्रमुख वक्त्या होत्या. डॉ. माधवी वैद्य उद्घाटक होत्या. मेळाव्यात 'मी आणि माझे साहित्य' या विषयावर श्री. संजय जोशी, डॉ. स्वाती कर्वे यांनी आपले विचार मांडले. कथाकथन विभागात डॉ. प्रतिमा इंगोले व श्रीमती प्रमोदिनी वडके-कवळे यांनी बहारदार कथा सांगितल्या. कवी संमेलनात बेचाळीस नवोदित कवींनी आपल्या कविता सादर केल्या. मेळाव्याचा समारोप प्रा. मिलिंद जोशी यांनी केला.

या मेळाव्यास २०० वाचक-लेखक उपस्थित होते. 'असे साहित्यविषयक कार्यक्रम होणे गरजेचे आहे,' अशी प्रतिक्रिया वाचकांनी व्यक्त केली.

श्री. विजय दांडेकर, श्री. मधुकर तवले, सौ. प्रतिभा पाठक, श्री. गोपाळ कुलकर्णी, सौ. मीना राव, सौ. वसुधा कर्दळे, सौ. मंजरी ताम्हणकर, प्रा. गिरीश झांवरे, श्री. चंद्रशेखर धर्माधिकारी, श्री. देवदत्त पाटणकर, श्री. श्यामराव खोले या सदस्यांनी मेळावा यशस्वी होण्यासाठी परिश्रम घेतले.

**श्री. गोपाळ माधव कुलकर्णी**



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

## — जुळे सोलापूर शाखा —

**तारीख ८/१०/२०११**

महाराष्ट्र साहित्य परिषद, जुळे सोलापूर शाखा, आणि आनंदश्री प्रतिष्ठान सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने शनिवार, दिनांक ८ ऑक्टोबर २०११ रोजी रात्रौ ८ ते ११ वाजेपर्यंत स्मृती उद्यान, जुळे सोलापूर येथील रा. स. चंडक खुले सभागृहात शरद ऋतूच्या टिपुर चांदण्यात काव्यरस आणि शिवरंजनी वाद्यवृंदाचा चंद्र, चांदण्यावरील हिंदी, मराठी गीतांचा सुरेल कार्यक्रम आयोजित केला होता.

मा. श्री. दत्ता हलसगीकर, डॉ. वासुदेव रायते, डॉ. सौ. माधवी रायते, आकाशवाणी सोलापूरचे कार्यक्रमं अधिकारी मा. श्री. सुनील शिनखेडे आणि प्रा. सौ. सरिता कोठडिया यांनी प्रत्येकी दोन कविता अतिशय सुंदररीत्या सादर केल्या.

त्यानंतर शिवरंजनीच्या कलाकारांनीही हिंदी व मराठी गीते चंद्र, चांदण्याशी संबंधित सादर केली. या कार्यक्रमाला आनंदश्री प्रतिष्ठान व म. सा. प. शाखा जुळे सोलापूरचे सदस्य आणि सोलापूरचे माजी जिल्हाधिकारी श्री. जगदीश पाटील, सौ. माया पाटील, बँक ऑफ महाराष्ट्रचे क्षेत्रीय प्रबंधक श्री. प्रकाश बावसकर, सौ. बावसकर, श्री. ठाकरे आदी मान्यवर उपस्थित होते.

सदर कार्यक्रमाचे प्रास्ताविक अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांनी केले, तर आभार प्रदर्शन कार्याध्यक्ष श्री. सुधाकर जोशी यांनी केले. त्या वेळी कार्यकारिणी सदस्य सौ. शांताबाई क्षीरसागर यांनी कार्यक्रमाला अनुरूप एक कविता सादर केली, दुग्धपानानंतर कार्यक्रम संपला.

**तारीख - १७/१०/२०११**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूरचा उद्घाटन समारंभ दिनांक १७/१०/२०११ रोजी ज्येष्ठ साहित्यिक आणि दै. 'लोकमत'च्या नागपूर आवृत्तीचे संपादक मा. श्री. सुरेशजी द्वादशीवार यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी समरसता साहित्य संमेलनाचे अध्यक्ष मा. प्रा. मधु जामकर हे होते. त्या वेळी आमदार दिलीप माने, म.सा.प. पुणेचे सोलापूर प्रतिनिधी श्री. जे. जे. कुलकर्णी, श्री. पद्माकर कुलकर्णी, म. सा. प. सोलापूर शाखेचे अध्यक्ष डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली, माजी अध्यक्ष ज्येष्ठ कवी श्री. दत्ता हलसगीकर, बँक ऑफ महाराष्ट्रचे क्षेत्रीय प्रबंधक मा. श्री. प्रकाश बावसकर आदी मान्यवर व्यासपीठावर उपस्थित होते.

कार्यक्रमाचे प्रास्तविक कार्याध्यक्ष श्री. सुधाकर जोशी यांनी केले, पाहुण्यांचा परिचय अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते यांनी करून दिला.

सूत्रसंचालन कार्यवाह श्री. प्रशांत जोशी यांनी केले, तर कार्यवाह श्री. गिरीश दुनाखे यांनी आभारप्रदर्शन केले. उद्घाटनसोहळा संपन्न झाल्यावर 'भक्तीसंध्या' हा सांस्कृतिक कार्यक्रम झाला.

सदर कार्यक्रमाला म.सा.प. जुळे सोलापूरचे पदाधिकारी, सर्व आजीव सदस्य, इंडियन मॉडेल स्कूलचे श्री. ए. डी. जोशी, सौ. सायली जोशी, श्री. र. श्री. जहागिरदार, सौ. बावसकर, डॉ. सौ. माधवी रायते, श्री. किशोरजी चंडक, श्री. ठाकरे, म.सा.प. सोलापूर शाखेचे सर्व मान्यवर उपस्थित होते. तसेच सोलापुरातील सर्वच क्षेत्रातील अनेक मान्यवर मंडळी आवर्जून उपस्थित होती.

**गिरीश दुनाखे**
कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर.



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येणें वाग्यज्ञें तोषावें
महाराष्ट्र साहित्य परिषद

## (नवीन सभासदत्वाकरिता आवेदनपत्र)

मा. प्रमुख कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ४११ ०३० यांसी

दिनांक :

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेची घटना व नियमावली (दि. १ जानेवारी २००१ पासून अमलात आलेल्या घटनेनुसार) यांना अनुसरून मी या संस्थेचा/ची आजीव सभासद होऊ इच्छितो/इच्छिते.

**वैयक्तिक माहिती**

आडनाव : प्रथम नाव : वडिलांचे/पतीचे नाव :

जन्म दिनांक : शिक्षण : लिंग : पुरुष / स्त्री

व्यवसाय : साहित्यविषयक :

संपूर्ण पत्ता :

देश : राज्य : जिल्हा :

शहर : पिन कोड :

दूरभाष क्र. : भ्रमणभाष क्र. : ई-मेल :

**सभासद माहिती**

सूचक क्रमांक : सूचकाचे नाव :

अनुमोदक क्रमांक : अनुमोदकाचे नाव :

**देयक तपशील**

सदस्यत्व : रक्कम : भरणा पद्धत :

बँकेचे नाव : दिनांक : पावती क्रमांक :

**ग्रंथालयाची वर्गणी**

वर्गणी : अनामत :

भरणा पद्धत : बँकेचे नाव : पावती क्रमांक :

वाचक क्रमांक : शेवटची मुदत :

सभासद क्रमांक :

सही : ____________

**टीप–** आजीव सभासद वर्गणी रु. १००० (चेक असल्यास रु. २५ अधिक), ग्रंथालय वर्गणी रु. २०० अनामत ठेव रु. ४००, एकूण रु. १६०० (रु. १६२५)



अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
महाराष्ट्र साहित्य परिषद

(विद्यमान सर्व सभासदांनी अद्ययावत माहिती भरून पाठविण्यासाठी)

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

टिळक रस्ता, पुणे ४११ ०३० दूरध्वनी : (०२०) २४४७५९६३/३२५४५६५९
वेबसाइट : www.masapapune.org स्थापना : २७ मे १९०६ नोंदणी क्र. ४१९

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या आजीव सभासदांची माहिती अद्ययावत करण्यासाठी पुढील माहिती त्वरित पाठवावी, ही विनंती.

आपला,
प्रा. मिलिंद जोशी
(प्रमुख कार्यवाह, म. सा. परिषद, पुणे)

सभासद क्रमांक ______

**वैयक्तिक माहिती**

आडनाव : ______ प्रथम नाव : ______ वडिलांचे/पतीचे नाव : ______

जन्म दिनांक : ______ शिक्षण : ______ लिंग : पुरुष / स्त्री

व्यवसाय : ______ साहित्यविषयक : ______

संपूर्ण पत्ता : ______

देश : ______ राज्य : ______ जिल्हा : ______

शहर : ______ पिन कोड : ______

दूरभाष क्र. : ______ भ्रमणभाष क्र. : ______ ई-मेल : ______

सही : ______



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

महाराष्ट्र साहित्य परिषद

# महाराष्ट्र साहित्य परिषद आणि राष्ट्र सेवा दल

यांच्या संयुक्त विद्यमाने

# पहिले युवा साहित्य-नाट्य संमेलन

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि राष्ट्र सेवा दल यांच्या संयुक्त विद्यमाने प्रथमच पहिले युवा-साहित्य-नाट्य समंलेन २३,२४, व २५ डिसेंबर २०११ रोजी पुण्यात साने गुरुजी स्मारक परिसरात आयोजित करण्यात आले आहे. या संमेलनाच्या अध्यक्षपदी प्रसिद्ध लेखक आणि संगणकतज्ज्ञ डॉ. अच्युत गोडबोले यांची निवड करण्यात आली आहे.

नव्या प्रतिभेचा शोध आणि युवा वर्गाला साहित्याकडे आकर्षित करणे हाच या संमेलनाचा मुख्य हेतू आहे. हे संमेलन पारंपरिक पद्धतीने न करता तंत्रज्ञानाशी निगडीत युवा पिढीला कलेबरोबरच करिअरचेही मार्गदर्शन व्हावे, या दृष्टीने कार्यक्रमांचे नियोजन केले आहे.

युवा वर्ग हा साने गुरुजींच्या कार्याचा आणि साहित्याचा केंद्रबिंदू होता. त्यामुळे राष्ट्र सेवा दल आणि मसापच्या संयुक्त विद्यमाने हा उपक्रम घेत आहोत.

## पहिला दिवस -

**दि. २३ डिसेंबर २०११ । दुपारी ४ ते ७** *महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी कविता, एकपात्री अभिनय, उत्स्फुर्त वक्तृत्व स्पर्धा*

**सायंकाळी ७ ते १० कॅम्पफायर** सेवादलातील कार्यकर्त्यांचे गीतगायन आणि **'आनंदयात्री मी'** हा कार्यक्रम (कविता, गाणी, बोलगाणी, गझल) – मंगेश पाडगावकर यांच्या कवितांवर कार्यक्रम. **सादरकर्ते** । अनन्वय, पुणे या संस्थेचे कलाकार **संगीत संयोजन** । राहुल घोरपडे

## दुसरा दिवस-

**दि. २४ डिसेंबर २०११ । सकाळी १० ते १२ *उद्घाटन कार्यक्रम,* अध्यक्ष** – डॉ. अच्युत गोडबोले

**दुपारी १२ ते १ भोजन** **दुपारी १ ते ३ *परिसंवाद* । आम्ही का वाचतो, काय वाचतो? सहभाग** । महाविद्यालयीन विद्यार्थी

**दुपारी ३ ते ३.३० *चहापान***

**दुपारी ३.३० ते ५ । *आम्ही चालवू हा पुढे वारसा* अध्यक्ष । सहभाग** । प्रसाद चांदेकर, संजय नहार, उज्ज्वला लवाटे, संतोष गवळे

**सायंकाळी ५।। ते ७ । *करिअर : नव्या दिशा, नव्या वाटा* अध्यक्ष । दीपक शिकारपूर सहभाग** । राहुल सोलापूरकर, संदीपकुमार साळुंखे, शर्वरी जमेनीस, डॉ. आनंद भालेराव, सुषमा चव्हाण

**सायंकाळी ७ ते ८ *भोजन***

**रात्री ८ ते १० महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या नाट्यशिबिरातील नाट्यप्रयोग *।। स्त्रीसुक्त ।।* निर्मिती** । संवाद, पुणे, **लेखक** । योगेश सोमण **नृत्य दिग्दर्शन** । निकिता मोघे

## तिसरा दिवस -

**दिनांक २५ डिसेंबर २०११, सकाळी १० ते १२ । *समर्थ भारताचे निर्माण आणि तरुणाई* अध्यक्ष** । विश्वजित कदम **सहभाग** । संदीप बर्वे, ॲड. असीम सरोदे, तृप्ती कोलते-पाटील, राहुल कराड

**दुपारी १२ ते १ *भोजन***

**दुपारी १ ते ३ । *असे घडलो आम्ही* अध्यक्ष** । सुधीर गाडगीळ **सहभाग** । पराग करंदीकर, सुभाष वारे, अभिजीत कोसंबी, योगेश सोमण, नीलिमा मिश्रा

**दुपारी ३ ते ३.३० चहापान**

**दुपारी ३.३० ते ६.३० । *प्रकाशन व्यवसाय : आव्हाने आणि संधी* अध्यक्ष** । देवयानी अभ्यंकर **सहभाग** । विनोद शिरसाठ, साकेत भांड, मंदार जोगळेकर, क्रांती देसाई, अभिषेक जाखडे

**सायंकाळी ६.३० ते ७.३० *भोजन***

**रात्री ८ ते १० *कविसंमेलन* अध्यक्ष** । प्रकाश होळकर **सहभाग** । वलय मुळगुंद, कल्पना दुधाळ, नचिकेत जोशी, हीना कौसर खान, वैशाली मोहिते, प्रतिक पुरी, भूषण राक्षे, राजू सगर, प्रशांत चव्हाण, उत्पल चंदावर, किशोर शिंदे, प्रणव प्रियांका प्रकाश आणि सहभागी महाविद्यालयीन विद्यार्थी




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
येथे वाग्देवी तोषावे
महाराष्ट्र साहित्य परिषद

**Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : October to December 2011**
Registered with the register of Newspaper for India under No. 6398/57
*Book Pkt. Periodical Category*


# मराठी वाङ्मयाचा इतिहास

**खंड १ ला :** रु. ५००/-
**खंड २ रा :** भाग १ : रु. ७००/- व भाग २ : रु. ७००/-
**खंड ३ रा :** रु. ३५०/-
**खंड ४ था :** रु. ४००/-
**खंड ५ वा :** भाग १ : रु. ३५०/- व भाग २ : रु. ३५०/-
**खंड ६ वा :** भाग १ : रु. ३५०/- व भाग २ : रु. ३००/-
**खंड ७ वा :** भाग १ : रु. ७००/-, भाग २ : रु. ८००/-, भाग ३ : रु. ७००/- व भाग ४ : रु. ७०

**एकूण रु. ७०००/-**

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/-**

डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठ
(वरीलसंचातीलसुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट.
व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

: मागणीसाठी संपर्क :

**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे – ४११ ०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३


बुक-पो




प्रेषक
**प्रमुख कार्यवाह,**
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत



